# श्रीजयदेवकृत

## श्रीमद्गीतगोविंदप्राकृतटीकासहित

विद्वज्जनाचा सहाय्यानें

मुकाम

मुंबईयेथे.

विठ्ठलसखारामअग्निहोत्रीयाणीं आपल्या

शिळाछापावरछा

पिलें.

शके१७७५

प्रमादीनामसंवत्सरे वैशाख वद्य ११ गुरुवार

सन् १८५३ इशवी. माहे जून

पृ अनुक्रमणिका ।



समाप्तम्

# अथश्रीमद्गीतगोविंदप्राकृतटीकास मूलाप्रारभ्यते

श्रीगणेशायनमः॥ अविघ्नमस्तु॥ श्रीगोविंदमहं नत्वागीतगोविंदटिप्पणम्॥सुगमंबालबोधार्थंकुर्वेप्राकृतभाषया॥१॥ ॥ ॥श्रीजयदेवकविजोतो गीतगोविंदनामकग्रंथारंभाचेठायींनिर्विघ्नग्रंथसमाप्तिव्हावी एतदर्थमंगलाचरणातेंआचरतहोत्सातागंथप्रतिपाद्यराधामाधवसुरतक्रीडेचाउत्कर्षजोत्यातेंस्मरतो. ॥ श्लोक॥ मेघैर्मेदुरमंबरंवनभुवःश्यामास्तमालद्रुमैर्नक्तंभीरुरयंत्वमेवतदिमंराधेगृहंप्रापय॥ इत्थंनंदनिदेशतश्चलितयोःप्रत्यध्वकुंजद्रुमं राधामाधवयोर्जयंतियमुनाकूलेरहःकेलयः॥१॥ टी॰ (राधेअंबरंमेघैर्मेदुरं) हेराधिके आकाशजेतें अभ्रेंकरूनघनदाटवर्तलेंआहे आणखी (वनभुवः) वनभूमिकाज्यात्या (तमालद्रुमैः श्यामाः) तमालवृक्षांचेदाटीकरून शामरूपवर्तताहेत आणखी (नक्तं) रात्रिसमयवर्ततो (अयं) हाकृष्णजोतो. भीरुः) भेकडआहे. एवंचदेशकालही भयंकरआणखीकृष्णाही स्वयेंभयशील यास्तव (त्वमेवइमंगृहंप्रापय) तूं

च याकृष्णातें गृहाप्रति पाविव ( इत्थंनंदनिदेशतः ) या प्रकारें नंदाची आज्ञाहोतांच ते आज्ञेकरून ( चलितयोः ) यमुनातीराहून गृहाप्रति जायाकारणें निघालेत ऐसे ( राधामाधवयोः ) राधामाधव उभयतांजे त्याच्या ( रहःकेलयः ) एकांतक्रीडाज्यात्या ( यमुनातीरे ) यमुनेच्यातिरीं ( प्रत्यध्वकुंजद्रुमं ) प्रत्येकमार्गस्थकुंजद्रुमाप्रति ( जयंति ) सर्वापेक्षां आधिक्येंवर्त्ततहेत एथें नंदाचीवाचा गूढार्थीतें सूचविती जालि तोअर्थऐसा ( मेघैर्मेदुरमंबरंवनभुवःश्यामास्तमालद्रुमैर्नक्तम् ) एणेकरून शृंगाररसाचें देशकालरूप उद्दीपन कारण वर्णिलें आणखी परस्त्री पुरुषाच्या स्वछंद-क्रीडेस अनुकूल अंधकार जोतोही सूचविला ( हेराधेत्वमेव ) येणेंकरून शृंगार रसाचा आश्रयरूप विभाव वर्णिला ( अयंभीरुः ) येणेंकरून अधैर्यरूप शृंगाराचें कार्य अनुभवादिक वर्णिलें ( गृहंप्रापय ) ह्मणजे गृहधर्मीतें पाववि ह्मणजे तूं गृहिणी होउन सुरतसुखातें भोगवीं येणेंकरून शृंगाररसाचा रतिनामकस्थायिभाववर्णिला येणेंउन्मादादिक साधारणभावही कल्पावा एवंच श्रीजयदेव कविजोतो नंदवाणीसूचित मेघमंडलादिशृंगारभावपरिपुष्टरतिरूपशृंगाररसजोत्यातें मंगलाचरणीं दाखऊन तदु-

सन्न राधामाधवलीला ज्या त्यातें स्मरताजाला एथें आणखी लाक्षणीक अर्थकल्पना घडते ते या प्रकारें अंबर शब्दें करून अति सूक्ष्मत्वास्तव सर्वकल्पनाश्रयत्वास्तव लिंगसादृश्यास्तवही मन जाणावें मेघशब्दें विषयवृक्ष जीवनरूप अनेक क्रियमाणकर्मं जाणावीं त वनफळः वनभू शब्दें विषयवासना श्यामशब्दें मलिनत्व तमालद्रुमशब्दें तमोगुणात्मक

विषय (नक्तं) शब्दें अज्ञान भीरुशब्दें तापत्रयव्याप्त मुमुक्षु अयंशब्दें ईश्वराच्या अंशजीव राधाशब्दें सात्विक बुधि गृहशब्दें ब्रह्म (नंद) शब्दें आनंददायक ईश्वर निदेश शब्दें ईश्वराज्ञारूप वेदशास्त्र चलित शब्दें निवृत्ति मार्गीं संचार अध्वशब्दें निवृत्तिमार्ग कुंजद्रुम शब्दें श्रवण मननादि वेदांतविचार यमुनाशब्दें कर्मवाहिनी संसृति कूलशब्दें निर्वृत्तिकर्म रहःशब्दें तुरीया केलिशब्दें स्फरवक्रीडा जयंति शब्दें विषयानंदाहुन उत्कर्ष बोलिजेतो याप्रकारें ग्रंथसमाप्तिपर्यंत प्रतिपदि यथामति अर्थकल्पना घडेल परंतु शृंगार प्रधानकाव्यामधें तो अर्थ प्रस्तुत आणखी अप्रसिद्ध अत्यंत क्लिष्ट यास्तव त्या आयासावर अनादर करून सगुण चरित्र रूपमुख्यार्थींच प्रवर्त्तिजेतें अम्हेंहें नभदाटलें धरणीहीकाली तमालद्रुमी जालीरात्रिभयेंहरी थरथरी यातें गृहीं राधिके ॥

त्यावेंतूंच असेंवदेहरिपिता दोघेंतदाचालिली ॥ त्याचात्यायमुनातटींद्रुमगृहींलीलारतें जिंकिती ॥ १॥ श्लोक

वाग्देवताचरितचित्रितचित्तसद्मा पद्मावतीचरणचारणचक्रवर्त्ती श्रीवासुदेवरतिकेलिकथासमेतमेतंकरोतिजयदेवकविःप्रबंधं २ टी०

(वाग्देवताचरितचित्रितचित्तसद्मा) हेवेदशास्त्ररूपसरस्वतीचरितजें तेणेंकरून रंगलें आहे अंतःकरण सदनज्याचें ऐसा आणखी (पद्मावतीचरणचारणचक्रवर्त्ती) लक्ष्मीचरण सेवाजी तीणेंकरून चक्रवर्त्ती राजाचेपरि भाग्यवंत ऐसा जयदेव कविजोतो (श्रीवासुदेव कथासमेतं) राधामाधवसुरतक्रीडा कथनयुक्त ऐसा एतंप्रबंधं) हा ग्रंथजो यातें (करोति) करितो विद्या आणखी लक्ष्मी येणेंकरून संपन्नमी जयदेव कविजोतो श्रीकृष्णा कथारूप ग्रंथातें चरितों हें श्लोकाचें तत्व येणेंकरून या ग्रंथाचा विषय वर्णिला २ यानंतर कविजोतो स्वग्रंथाचें प्रयोजन वर्णितो (यदिहरिस्मरणे सरसंमनो यदि विलासकलासुकुतूहलं मधुरकोमलकांतपदावलिंश्रृणुतदाजयदेवसरस्वतीं ३ टी० (यदिहरिस्मरणेसरसंमनः) जरिमोक्षदायकहरि स्मरणी स

प्रेममनवर्ततें किंवा ( यदिविलासकलास्कुतूहलं ) जरि संसार सुखदायक विलासकला ज्यातद्विषयीं हर्षवर्त्ततो तर्हि हीजयदेवाची वाणीजी तीतें ( शृणु ) ऐक येणेंकरून याग्रथीं भुक्तिमुक्तिरूप प्रयोजन सूचविलें वाणी कशेप्रकारची ( मधुरकोमलकांतपदावलिं ) अर्थेंकरून मधुरऐसी शब्दें करून कोमल ऐसी रसालंकारादि साहित्येंकरून कांतह्मणजे रमणीय ऐसी पदपक्ति जीचेठायीं अशे प्रकारची येणेंकरून इतरप्रबंधापेक्षां अधिक चमत्कार रूप प्रयोजनातें सूचविता जाला ३ यानंतर कवीजोतो इतर कवीपेक्षां आपुल्या कवित्वाचा असा धारण गुणजो त्यातें बोलतो ॥ श्लो० ॥ वाचः पल्लवयत्युमापतिधरः संदर्भशुद्धिं गिरां जानीते जयदेव एव शरणः श्लाघ्यो दुरूहद्रुतेः शृंगारोत्तरसत्प्रमेयरचनै राचार्यगोवर्धनस्पर्धी कोपि न विश्रुतः श्रुतिधरो धोयीकविक्ष्मापतिः ४ टी० ( उमापतिधरः ) उमापतिधरनामक कविजोतो ( वाचः पल्लवयति ) शब्दातें मात्र विस्तारितोंन अर्थातें ( जयदेव एव ) जयदेव कवीजोतोच ( गिरां संदर्भसंशुद्धिं जानीते ) शब्दरचनाचमत्कारातें जाणतो शरणनामककविजोतो. ( दुरूहद्रुतेः श्लाघ्यः ) दुस्त- करी तीस्तव मान्य जाला आहे



शृंगार मुख्य उत्तमप्रमेयजें त्याचा गुंफनेकरून आचार्य गो
वर्धन नामक कवि जो तत्समान ( कोपिनविश्रुतः ) कोणि
एक न ऐकिला धोयीनामक ( कविक्ष्मापतिः ) कविराज
जो तो ( श्रुतिधरः ) श्रवणमात्रेंकरून ग्रंथातें धरणार ऐसा
वर्त्ततो परंतु याकवीपेक्षां ग्रंथरचना कौशल्यजेंतें जयदेवाचें
न अधिकहोय हाअभिप्राय ४ यानंतर जयदेवकविजो
तो मंगलाचरण मिषेंकरून दशावतारातें अनुक्रमें वर्णितो.

मालवरागेरूपकताले अष्टपदी

प्रलयपयोधिजले धृतवानसि वेदंविहितवहित्रचरित्रमखे
दं केशवधृतमीनशरीरजयजगदीशहरे धृ० १ क्षि
तिरतिविपुलतरे तवतिष्ठति पृष्ठे धरणिधरणकिणच
क्रगरिष्ठे केशवधृतकच्छपरूपजयजगदीशहरे २
वसति दशनशिखरेधरणीतवलग्ना शशिनिकलंक
कलेवनिमग्ना केशवधृतसूकररूपजयजगदीशहरे
३ तवकरकमलवरे नखमद्भुतशृंगं दलितहिरण्य
कशिपुतनुभृंगं केशवाधृतनरहरिरूप जयजगदी
शहरे ४ छलयसिविक्रमणे बलिमद्भुतवामन पदन
खनीरजनितजनपावन केशवधृतवामनरूपजय-
यजगदीशहरे ५ क्षत्रियरुधिरमये जगदपगतपापं

स्त्रपयसिशमितभवतापं केशवधृतभृगुपतिरूपजयज
गदीशहरे ६ वितरसिदिक्षुरणे दिक्पतिकमनीयं द
शमुखमौलिबलिंरमणीयं केशवधृतरामशरीर जय
जगदीशहरे ७ वहसिवपुषिविशदे वसनंजलदाभं
हलहतिभीतिमिलितयमुनाभं केशवधृतहलधररू
पजयजगदीशहरे ८ निंदसियज्ञविधेरहहःश्रुति-
जातं सदयहृदयदर्शितपशुघातं केशवधृतबुद्धशरीर
जयजगदीशहरे ९ म्लेंछनिवहनिधनेकलयसिकर
वालं धूमकेतुमिव कमपिकरालं केशवधृतकल्कि
शरीर जयजगदीशहरे १० श्रीजयदेवकवेरिदमुदित
मुदारं शृणुसुखदंशुभदंभवसारं केशवधृतदशवि
धरूपजयजगदीशहरे ११ टीका प्रलयेत्यादि हेके-
शव हेजगदीश हरे हेधृतमीनशरीर ह्मणजे धरिला आहे म-
त्स्यावतार जाणें याप्रकारचा तूंजोतो (जय) सर्वोत्कर्षे वर्त्ता
वें ह्मणजे भक्तपालनार्थ सर्वांहून उत्कृष्ट होय (प्रलयपयोधिज
लेवेदंधृतवानसि) प्रलयकाळीचें समुद्रजलजें त्याचेठायीं वे-
दातें धरिताजालास कोणत्याप्रकारें (अखेदं) आयासनक
रितां (विहितवहित्रचरित्रं) वेदकसाकृत आहे नौकाच-
रितजेणें नौकासागरतारकावेदही नित्यनैमित्तिकर्मप्रतिपाद

न करितहोत्साता संसारतारक होतो ( क्षितिरिति ) धरिलेंकूर्म रूप जेणें याप्रकारचा हे केशवा ( जय ) आपला उत्कर्ष दाखवि ( धरणिधरणकिणचक्रगरिष्ठे ) पृथ्वीचें धारण जेंतेणेंकरून किण ह्म० मृतरक्तग्रंथि चक्राकार तेणेंकरून अत्यंत दृढ ऐसें ( तवपृष्ठे ) तुझें पृष्ठजें त्यावर ( क्षितिः तिष्ठति ) पृथ्वि अद्यापि वर्त्तते

वसतीति ( धृतसूकररूप ) धरिलें वराहरूपजाणें याप्रकारचा हे केशवा ( शशिनिनिमग्नाकलंककलेव ) चंद्राचे ठायीं वर्तली कलंक रेखाजशी ( तद्वत् तवदशनशिखरेलग्नाधरणीवसति ) तूझादंताचे अग्रभागिं संलग्नहोत्साती पृथ्वीवर्तते ३ तवेति ( हेधृतनरहरिरूप ) धरिलें नृसिंहरूपजेणें ( हे केशव तवकरकमलवरे अद्भुतशृंगंनरवं ) तुझे हस्तरूप कमल श्रेष्ठजें त्याचे ठायीं नखरूप अद्भुत अग्रवर्त्ततें तें कसेंप्रकारचें ( दलितहिरण्यकशिपुतनुभृंगं ) विदारिली हिरण्यकशिपूची तनुजी तोच कोणिएक ( भृंगं ) ह्मणजे भ्रमर जेणें ऐसें ह्मणजे कमळ दळाचा अग्रानें भ्रमर विदारिलो येथें कमळाग्रानें भृंगविदारिला या आश्चर्यास्तव नरव अद्भुत होय ४ छलयसीति ( हे अद्भुतवामन ) हे आश्चर्यकारक वामनतूं ( विक्रमणे ) ह्मणजे चरणेकरून भूमीतें मोजित असतां ( बलिंछलयसि )

वलितें रुकविताजालास तूं कसा ( पदनखनीरजनितजनपावन ) पदनखसंबंधि गंगारूप नीरजें तेणेंकरून निर्मिलीं चतुर्दशभुवनजन पवित्रताजेणें याप्रकारचा अतएव अद्भुत होय हे धृतवामनरूप जयजगदीशहरे ५ (क्षत्रियेति) (हेकेशव धृतभृगुपतिरूप) धरिलें परशुरामरूपजेणें तो तूं (क्षत्रियरुधिरमयेपयसि) क्षत्रियांचा संहारकरून त्याचें रक्तरूप जलजें त्यामधें (जगत्) सकलजगातें (स्नपयसि) स्नानकवितोसा तेणेंकरूनजगत् (अपगतपापं) जगजेंतें निःपाप आणखी (शमितभवतापं) संसारताप रहित वर्ततें अद्यापि कुरुक्षेत्रिं स्यमंतपंचक तीर्थाचेठायीं स्नानकरून निःपाप होताहेत हेंप्रसिद्ध ६ वितरसीति (हेधृतरामशरीर) धरिला रामावतारजेणे तो तूं (दिक्पतिकमनीयं) चरणाचेठायीं इंद्रादि दिक्पालांहीं इच्छिला ऐसा (दशमुखमौलिबलिंदिक्षुवितरसि) रावणमस्तकरूपबलिजो त्यातें दाहीदिशाचेठायीं अर्पितोस तो बलि कसा (रमणीयं) मनोहर याप्रकारचा ७ (वहसीति (हेकेशव धृतहलधररूप) धरिलें बळरामरूपजेणें- याप्रकारचा हरे तुंविशदेवपुषि गोरवर्णदेहाचेठाईं (जलदाभंवसनंवहसि) नीलांबरातें वाहताजालासि तें कशीप्रका

रत्वें हलहति भीति मिलित यमुनाभं तु ह्या हलाची हति ह्मण जे घाय जो त्याचा भयेंकरून मिळाली यमुनाजी तद्वत् कांतिजा वस्त्राचिऐसें यमुनासहज कृष्णवर्ण तथापि भययोगें अत्यंत कृष्णत्व सूचविलें ८ ( निंदसीति हे केशव ) धृतबुद्धावतार ( हे सदयह्रदय ) दयायुक्त ह्रदय ज्याचें तो तूं हे सदय ह्रदया ( यज्ञविधेः दर्शितपशुघातं ) यज्ञकांडसंबंधि ऐसें प्रकट केला पशुघात जेणें ह्मणजे पशुहिंसाप्रतिपादक ऐसें ( श्रुतिजातंनिंदसि ) वेदवृंद जे, त्यातें, निंदितोस, ( अहह ) हें पशुवधातें, स्मरून, खेदानुकरण, दाखविलें, अ अथवा यज्ञकांडाचा प्रतिपादक होऊन त्याचीच निंदा हें आश्चर्य, ( अहह ) येणें सूचविलें ९ ( म्लेंछेति ) हे धृतकल्किरूपा केशवा, तूं म्लेंछसमुदाय वधाविषयीं ( करवालं कलयसि ) खड्गातें धरणार खड्गकसें ( धूमकेतुमिव ) अग्नीचे परी किंवा धूमकेतु ह्मणजे उत्पातग्रहविशेषजो त्याचेपरी ( करालं ) भयंकर असेप्रकारचें ह्मणजे अग्निपुंजयुक्त धूमजसा किंवानक्षत्रयुक्त केतुजसा तद्वत् सुवर्णमुष्टियुक्त तरवारितें धरणार आहेस कमपि ह्मणजे उपमारहित १० ( श्रीजयदेवेति ) हेजना ( श्रीजयदेवकवेः इदंउदारं उदितं ) श्रीमंत जयदेवकवि जो त्याचें हें उदार भाषणजें-

त्यातें (शृणु) ऐक तें कशेप्रकारचें (सुखदंशुभदंभव सारं) सुखदायक पुण्यदायक संसारामधें सारभूत असेप्र कारचें हे केशव (धृतदशविधरूप) धरिलें दशप्रकार रूप जेणें (तत्संबोधन) हे जगदीश हरे हे जगसते श्रीकृष्णा जय ११ हे सर्वही श्रीकृष्णाचे अंशावतार होत श्रीकृ ष्णाजो तो पूर्णावतार पूर्णब्रह्म होय तो अंशरूप अवतार नव्हे ऐसें सुचवायासाठीं एकाश्लोकें अवतार चरित्रदर्शन पूर्वक श्रीकृष्णातें जयदेवकवि वंदितो (वेदानुद्धरते जगन्निव हते भूगोलमुद्बिभ्रते दैत्यंदारयते बलिंछलयते क्षत्रक्ष यंकुर्वते पौलस्त्यंजयते हलंकलयते कारुण्यमातन्व ते म्लाछान्मूर्छयते दशाकृतिकृते कृष्णाय तुभ्यंनमः १ (वेदानुद्धरते) मत्स्यावतारें करून वेदातें उद्धरितो ऐसा (जगन्निवहते) कूर्मरूपें जगातें वाहतो ऐसा (भूगोलमु द्बिभ्रते) वराहरूपें करून भूमीतें ऊर्ध्व धरितो ऐसा (दैत्यं दारयते) नृसिंहरूपें हिरण्यकशिपुतें विदारितो ऐसा (बलिं छलयते) वामनरूपें बलितें वंचितो ऐसा (क्षत्रक्षयंकुर्व ते) भार्गवरूपें क्षत्रियांचा नाशा करितो ऐसा (पौलस्त्यंजयते) रामरूपें करून रावणातें जिंकितो ऐसा (हलंकलयते) बलभद्र रूपें हलातें धरितो ऐसा (कारुण्यमातन्वते) बुद्धरूपें करुणातें

विस्तारितो ऐसा (म्लेंच्छान्मूर्छयते) कल्किरूपें म्लेंच्छातें मारितो ऐसा (दशाकृतिकृते) याप्रकारें दहा अवतारातें करितो ऐसा श्रीकृष्णा तूं जो त्या तुज कारणें नमस्कार १ (गुर्जरीरागे प्रतिमठताः)

अष्टपदी श्रितकमलाकुचमंडल धृतकुंडल ए कलितललितवनमाल जयजयदेवहरे ध्रु० १ दिनमणिमंडलमंडन भवखंडन ए मुनिजनमानसहंस जय० २ कालियविषधरगंजन जनरंजन ए यदुकुलनलिनदिनेश जय० ३ मधुमुरनरकविनाशन गरुडासन ए सुरकुलकेलिनिदाना जय० ४ अमलकमलदललोचन भवमोचन ए त्रिभुवनभवननिधान जय० ५ जनकसुताकृतभूषण जितदूषण ए समर-शमितदशकंठ जय० ६ अभिनवजलधरसुंदर धृतमंदर ए श्रीमुखचंद्रचकोर जय० ७ तव चरणे प्रणता वयमिति भावय कुरु कुश-लं प्रणतेषु जयजयदेवहरे ८ श्रीजयदेवक वेरिदं कुरुते मुद मंगलमुज्वलगीतं जय० ९

टी० (श्रितेति) हे देवहरे म्हणजे हे देवा हे हरे जयजय-म्हणजे स्वभक्तपक्षपाताविषयीं पुनःपुना थोरपणें वर्त्त ए म्ह

णजे ( हेश्रितकमलाकुचमंडल ) करेंकरून सेविलें लक्ष्मी
चे स्तनमंडल जेणें याप्रकारच्या हेश्रीपते जयजय ( ए धृतकुं
डल ) ह्मणजे हेकुंडलधरा ( कलितललितवनमाल ) स्वी
कारिली सुंदर वनमाला जेणें अशोप्रकारचा हरे जय० १
( दिनमणीति एदिनमणिमंडलमंडन ) आत्मप्रकाशेंक
रून हेंसूर्यमंडलातें शोभवित्या कृष्णा ( हेभवखंडन ) हेजन्म
छेदका ( हेमुनिजनमानसहंस ) मुनिजनमानसिं वास
करित्या हंसा जयजयदेवहरे २ (कालियेति कालियवि
षधरगंजन ) हेकालियनामकसर्पमर्दनकरित्या हेजनरंज
का ( एयदुकुलनलिनेश ) हे यदुकुलरूपकमल
जें तप्तकाशकासूर्या जयज० ३ ( मधुमुरेति ) मधुदैत्यमुरा-
सुर नरकासुरयांच्या विनाशका हेगरुडवाहना ( हेसुर
कुलकेलिनिदान ) देवसमुदायाचे क्रीडेस कारण भूता ह्म
णजे दैत्याचा उपद्रव शमनकरून देवांतें स्वस्थ क्रीडा यासि
लाविलें जेणें याप्रकारच्या जय० ४ ( अमलेति ) निर्मल क
मलाचेपरि लोचन ज्याचे ( एभवमोचन ) हेसंसारमोचका
( त्रिभुवनभवननिधान ) त्रिभुवनरूप गृहजे याचेठाईं
निधानरूप जो तूं जय० ५ ( जनकेति हेजनकसुताकृ
तभूषण ) सीतेनें स्वहृदयीं केला भूषणाचेपरिजो ( एजि



तद्दूषण ) जिंकिला दूषणनामक असुरजेणे ( समरशमितदशकंठ ) युद्धाचेठायीं शमितकेला रावणजेणे एवंभूता हेरामा जय० ६ ( अभिनवेति अभिनवजलधरसुंदर ) हेनूतन मेघाचे परि सुंदरा ( एधृतमंदर ) हेमंदरा चळ धरित्या ( श्रीमुखचंद्रचकोर ) हेलक्ष्मी मुखचंद्राचे ठाईं लंपटा चकोरा जय० ७ ( श्रीजयदेवेति हेहरे तवचरणेप्रणतावयमितिभावय ) तुझे चरणाचे ठाईं प्रणिपात करितोंजालों आह्मी ऐसेंजाण ( प्रणतेषुकुशलंकुरु ) शरणागताचेठायीं कल्याणातें आचर ८ ( श्रीजयदेवकवेरिदंमंगलंमुदंकुरुते ) श्रीमंत जयदेव कवीचें हेंमंगलाचरणजेतें आनंदातें करितें तेंकसें ( उज्वलगीतं ) सुंदर आहे गीत ह्मणजे गाणें ज्याचे याप्रकारचा हरे जय० ९ यानंतर कविजोतो या ग्रंथाचे श्रोते जे त्यातें आशीर्वादातें रचितो, श्लोक पद्मापयोधरतटीपरिरंभलग्नकाश्मीरमुद्रितमुरोमधुसूदनस्य व्यक्तानुरागमिवखेलदनंगखेदस्वेदांबुपूरमनुपूरयतुप्रियंवः १ ( मधुसूदनस्यउरःवः प्रियंअनुपूरयतु ) हेजनहो मधुसूदनाचें वक्षस्थल जेंतें वः ह्मणजे तुमच्या ( प्रियंअनुपूरयतु ) अभिलषितातें पुरवो तें उरकसेंप्रकारचें ( पद्मापयोधरतटीपरिरंभलग्नकाश्मीरमुद्रितं ) पद्माह्मणजे लक्ष्मी-

तीची पयोधरतटी ह्मणजे स्तनाचीं अग्रें त्याच्या आलिंगनें करून भगवंताचें उरस्थलही कुंकुमांकित वर्तलें आहे तें तुमच्या मनोरथातें पूर्ण करो हा अर्थ ( व्यक्तानुरागमिव ) प्रकट अनुराग ज्याचे ठायीं याप्रकारचेंच काय अंतरंगी लक्ष्मी प्रीती जीती कुंकुममिषें करून बाहेर प्रकट केली आहे काय असे प्रकारचें आणखी ( खेलदनंगखेदस्वेदांबुपूरं ) अंतरीं खेळ तो अनंग ह्मणजे मदन जो त्यातें या खेदें करून ह्मणजे स्मरतश्रमें करून स्वेदजलाचा पूर वाहे तो ज्या उरावर असे प्रकारचें एवंच राधारूप लक्ष्मीच्या आलिंगनें प्रकट परमानंदातें करि जो भगवान् त्याची प्रार्थना कल्याणार्थ उचित यास्तव याप्रकारें प्रार्थिता जाला १ यानंतर कोणिएक समयाचे ठाईं राधाजीती कृष्णविरहें पीडिली होत्साती सखी द्वारा कृष्णाचा शोध आणती जाली ती कथा बोलतो. श्लोक

वसंते वासंती कुसुमकुसुमारैरवयवैर्भ्रमंतीं कांतारे बहुविहितकृष्णानुसरणां अमंदं कंदर्पज्वरजनितचिंताकुलतया चलद्बाधां राधां सरसमिदमूचे सहचरी १

टी० ( वसंते ) वसंतऋतुचे ठायीं ( वासंतीकुसुमसुकुमारैरवयवैः ) माधविकापुष्पांचे ठाईं कोमलत्व त्याचे परि कोमल ऐसे करचरणादिक अवयव जे तिहीं करून ( कांतारे



भ्रमंतीं ) दुर्गम वनामधें फिरत होत्साती ( बहुविहितकृष्णानुसरणां ) वारंवार केला कृष्णाचा शोध जीणें ऐसी राधा जी तीप्रति सहचरी ( सरसंइदंऊचे ) सखीजी तीस सरस याभाषणानें बोलतीजाली तीराधेची अवस्था वर्णितो ( अमंदकंदर्पज्वरजनितचिंताकुलतया चलद्राधां ) पुष्कल मदनपीडाजी तीणें करून उत्पन्न चिंता ह्मणजे कृष्णाची-उत्कंठाजी तीणें करून व्याकुलत्वजें त्यास्तव उत्पन्नसंतापजीराधा तीऐसी १ राधेप्रतिसखीचें भाषण

वसंतरागेरूपकताले अष्टप०

ललितलवंगलतापरिशीलनकोमलमलयसमीरे मधुकरनिकरकरंबितकोकिलकूजितकुंजकुटीरे १ विहरतिहरिरिहसरसवसंते नृत्यतियुवतिजनेनसमंसखिविरहिजनस्यदुरंते धृ० १ उन्मदमदनमनोरथपथिकवधूजनजनितविलापे अलिकुलसंकुलकुसुमसमूहनिराकुलबकुलकलापे २ मृगमदसौरभरभसवशंवदनवदलमालतमाले युवजनहृदयविदारणमनसिजनखरुचिकिंशुकजाले ३ मदनमहीपतिकनकदंडरुचिकेसरकुसुमविकासे मिलितशिलीमु-

खपाटलिपटलकृतस्मरतूणविलासे ४ विगलि
तलज्जितजगदवलोकनतरुणकरुणकृतहासे वि
रहिनिकृंतनकुंतमुखाकृतिकेतकिदंतुरिताशे ५
माधविकापरिमलललिते नवमालिकयातिसुगंधौ
मुनिमनसामपिमोहनकारिणि तरुणाकारणबं-
धौ ६ स्फुरदतिमुक्तलतापरिरंभणमुकुलितपु
लकितचूते वृंदावनविपिनेपरिसरपरिगतय-
मुना जलपूते ७ श्रीजयदेवभणितमिदमुद
यतिहरिचरणस्मृतिसारम् सरसवसंतसम
यवनवर्णनमनुगतमदनविकारम् ८
टी० विहरतीति ( हेसखि इह सरसवसंते हरिर्विह
रति ) हेराधे यासरसवसंत ऋतुचेठायीं श्रीकृष्णजो तो क्री
डतो ( युवतिजनेन समं नृत्यति ) तरुणस्त्रियांचा समु-
दायेसीं नृत्यकरितो, तोवसंतऋतू कशा प्रकारचा तें वर्णितों,
ललित ह्मणजे सुंदर लवंगलताजा त्यांच्या सहवासं करून को
मल ह्मणजे शीतल सुगंध ऐसा ( मलयसमीरे ) दक्षिण वा
यू ज्यावसंताचे ठाईं मधुकर ह्मणजे भ्रमर जे त्यांच्या समुदायें क
रून मिश्र ऐसे कोकिल पक्षिजे तिहीं करून शब्दायमान आहेत
( कुंजकुटीरे ) कुंजगृहें जीतीं ज्यावसंताचेठाईं ( विरहिजन

स्यदुरंत ) स्त्रीविरहित पुरुष किंवा पुरुषविरहित स्त्री जनजो
त्यास दुस्तर अशोप्रकारचा वसंतऋतू १ ( पुनःवसंतातेंव
र्णितो (उन्मदेति उन्मदमदन ) ह्मणजे प्रकट आहे हर्ष आणि
खी कामज्याचेठाई ऐसा पथिक वधूजनजो ह्मणजे प्रवासी पु
रुषांचा स्त्रियाजा त्यांहीं जनितविलापें केला शोक ज्यावसंतीं
अलिकुल ह्मणजे भ्रमर समुदायजो तेणेंकरून ( संकुल )
ह्मणजे व्याप्त ऐसे पुष्पांचे समूहजे तिहीं करून घनदाट आहेत,
बकुल वृक्षाचे समुदाय ज्यांचेठाई २ (मृगमदेति ) मृगमदसौ
रभ रभस ह्मणजे कस्तूरिच्या सुवासेंकरून हर्षजो त्यास योग्य
आहेत नवदल माला ह्मणजे नूतन पत्र पंक्तिज्यांच्या ऐसे सुगं
ध पत्रमंडित तमाल वृक्षजे ते ज्यावसंतीं युवजन ह्मणजे तरुण
जनजे त्यांच्या हृदयातें विदारिताहेत ऐसीं मदन रूप व्याघ्रांची
नखेंजीं त्याचे परी शोभाज्यांस ऐसे पळस पुष्पांचे समुदाय ज्याव
संतीं ३ (मदनेति) मदनमहीपति ह्मणजे कामरूप छत्रपति
राजाजो त्यांचे कनकदंड ह्मणजे छत्रजें तद्वत् शोभा ज्या
स ऐसीं केसर कुसुमें ह्मणजे नागचंपक पुष्पेंजीं त्याचा विका
स प्रफुल्लताज्याचेठाई मिळाली आहे भ्रमर ज्यावर ऐसे पाट
लिपुष्पांचे घोंसजे त्यांहि केलि आहे स्मरतूण ह्मणजे मदना
चा भाताजो त्याचि शोभा ज्याचेठाई ह्मणजे बाणयुक्त मद-

नाचा भालाजसा तद्वत् पाटलिपुष्पांचे गुच्छ शोभनाहेत ज्याव
संतीं ४ (विगलितेति) वसंतदर्शनेंकरून परम उत्कंठेच्या योगें
विगलित लज्जित ह्मणजे लज्जारहित ऐसें स्त्रीपुरुषरूप ज
गजें त्याच्या अवलोकनें करून तरुण ऐसे करुण नाम कवृक्षजे
त्यांहीं केलाहास ह्मणजे पुष्पविकास ज्याचेठाईं विरहि स्त्रीपु
रुषजे त्याचें निकृंतन ह्मणजे विदारण करिताहेत ऐसी कुंतमु-
खाकृति ह्मणजे भाल्यांची लोहमय कणिसेंजीं तद्वत् आकृति
ज्यांची ऐसीं केतकिपुष्पेंजीं त्यांहिदंतुरिनाशे व्यापिल्याहेत दि
शाज्यावसंतिं ५ (माधविकेति) वासंती पुष्पांचा परिमळेंकरून
सुंदर ऐसा आणखी नूतन पुष्पांचा पंक्तिजा तिहीं करून
अत्यंतसुगंध ऐसा मुनीचा मनासही मोह करितो ऐसा तरु
ण पुरुषांचा सहज मित्र ऐसा ६ (स्फुरदिति) स्फुरताहेत अति
मुक्त लता ह्मणजे वासंती लताज्या त्यांच्या आलिंगनेंकरून
कलिकारूप रोमांचयुक्तच काय ऐसा आम्रवृक्ष ज्याचेठाईं ऐसा
वृंदावननामक अरण्याचेठाईं समीप भूमिकेप्रति आसमंतात्
वर्त्तली यमुनाजी तीच्या जलेंकरून निर्मल ऐसा वसंतकाळ-
जो याचेठाईं श्रीकृष्णजोतों रासक्रीडेतें खेळतो ह्मणून रा-
धेप्रति सखीनें वर्णिलें आहे ७ (श्रीति) श्रीजयदेवानें वर्णि
लें ऐसेंहें सरसवसंतसमयीचें वर्णन जेंतें १ (उदयति) प्रका-



शयुक्त वर्त्ततें तें वर्णन कसेंप्रकारचें हरिचरण स्मरणरूप सार आहे ज्याचेठायीं पुनः कसेंप्रकारचें ( अनुगतमदनविकारं ) श्रवण मात्रें करून प्राप्त आहे मदन विकारजोतो ज्या वर्णनाचे ठायीं पुनर्वसंतातें वर्णन श्लो दरविदलितमल्लीवल्लिचंचत्पराग प्रकटितपटवासैर्वासयन्काननानि इहहि दहतिचेतः केतकीगंधबंधुः प्रसरदसमबाणप्राणवद्गंधवाहः १ टीका दरविदलितमल्लीवल्लिह्मणे कांहिसी प्रफुल्लित मल्लिका लताजी तीचे चंचत्पराग ह्मणजे देदीप्यमान पुष्प रजजें त्याच्या मिषें करून ( प्रकटितपटवासैः काननानि वासयन् ) प्रकट आहे सुगंध चूर्णाचें रजजें तिहीं करून सकळ अरण्यांतें सुवासित करित होत्साता ( केतकीगंधबंधुः ) केतकी पुष्पगंध सहवासी ऐसा ( प्रसरदसमबाणप्राणवद्गंधवाहः ) आंगीं विस्तारतो ऐसा मदनजो त्यास प्राणाचेपरि प्रिय गंधवाह ह्मणजे वायुजोतो ( इह ) यावसंतकाळीं ( चेतदहति ) विरहिजनाच्या चित्तातें दाहकरितो १ श्लो० उन्मीलन्मधुगंधलुब्धमधुपव्याधूतचूतांकुरक्रीडत्कोकिलकाकलीकलकलैरुद्गीर्णकर्णज्वराः नीयंतेपथिकैः कथंकथमपिध्यानावधानक्षणप्राप्तानाप्रियकथासमा

गमरसोल्लासैरमीवासराः२ उन्मीलत्(म्हणजे बाहेर फांकला मकरंद गंधजो तद्विषयीं लोभी भ्रमरजे त्याहीं कांहींसे कांपवि लेत आम्रवृक्षाचे अंकुरजे त्यांवर क्रीडा करिती ऐसे कोकिल पक्षीजे त्यांचे (काकलीकलकलैः) मधुर शब्दाचे कोलाहल जे तिहींकरून (उद्गीर्णकर्णज्वराः) उत्पन्न केलाआहे विरहिपुरुषांचा कर्णामधें संतापजाहीं ऐसें (अमीवासराः) हे वसंत संबंधि दिवसजे ते पथिकैः मार्गस्थ पुरुषाहीं (कथंकथमपि) बहुतसंकटें करून निनीयंते अतिक्रमीजे तात म्हणजे स्त्री विरहास्तव संकटेंकरून लोटिजेतात ते मार्गस्थ पुरुष कशेप्रकारचे ध्यानेंकरून म्हणजे स्त्रीचिंतनें करून चित्ताची एकाग्रताजी तीचेठाईं क्षणमात्र पावला प्रियकर स्त्रीजी तिच्या समागमें करून रसोल्लास म्हणजे सुखातिशय जोतो ज्याचेठाईं म्हणजे प्रवासी पुरुषजो ते कोकिलादिकाचा शब्द श्रवण होतांच मदव्यथा साहवेना यास्तव क्षणमात्र स्त्रियांच्या ध्यानेंकरून सुखातें अनुभवितहोत्साते यावसंतदिवसांची क्रमणा करिताहेत हाअर्थ २ याप्रकारें वसंतकाळातें वर्णून तदनंतर सखीजीती दुरून श्रीकृष्णजीतें दाखवित होत्साती राधिकेप्रति बोलते श्लोक अनेकनारीपरिरंभसंभ्रमस्फुरन्मनोहारिविलासलालसम् मुरारिमारादुपदर्शयंत्यसौ



सखीसमक्षंपुनराहराधिकाम् १ टी· अनेकनारी परिरं भ ह्मणजे अनेक गोपिकांचें आलिंगनजें त्याचा ( संभ्रम ) ह्मणजे आदरजो तेणेंकरून प्रकटलाआहेसुंदर विलासजो तद्वि षयीं लालस ह्मणजे लंपट ऐसा मुरारिजो त्यातें ( आरान् स मक्षं उपदर्शयंती ) दुरून प्रत्यक्ष अंगुलीनें दाखवित हो-त्साती ( असौ ) हीसखीजीती पुनः राधिके प्रति ( आह ) बोलतीजाली १

( अष्टपदी रामकरीरागे रूपकताले

चंदनचर्चितनीलकलेवरपीनवसनवनमा-ली केलिचलन्मणिकुंडलमंडितगंडयुगस्मि तशाली १ हरिरिहमुग्धवधूनिकरे ॥ विलासिनिविलासतिकेलिपरे धृ० १ पीनपयो धरभारभरेणहरिंपरिरभ्यसरागं गोपवधूर नुगायतिकाचिदुदंचितपंचमरागं हरि धृ· २ कापिविलासविलोलविलोचनखेलनजनित मनोजं ध्यायतिमुग्धवधूरधिकंमधुसूदनव दनसरोजंहरि० ३ कापिकपोलतलेमिलिता लपितुंकिमपिश्रुतिमूले चारुचुचुंबनितंब वतीदयितंपुलकैरनुकूले ह०॥ ४ केलिकला

कुतुकेनचकाचिदमुंयमुनाजलकूले मंजुल वंजुलकुंजगतंविचकर्षकरेणदुकूले ह० ५ करतलतालतरलवलयावलिकलितकलस्व नवंशे रासरसेसहनृत्यपराहरिणायुवतिःप्रश शंसे ६ श्लिष्यतिकामपिचुंबतिकामपिकाम पिरमयतिरामां पश्यतिसस्मितचारुपरामप रामनुगच्छतिवामाम् ७ श्रीजयदेवकवेरिदम द्भुतकेशवकेलिरहस्यम् वृंदावनविपिनेललितं वितनोतुशुभानियशस्यम् ८ (हरिरिति) हे विलासिनिइहमुग्धवधूनि करेहरिः विलसति ) हेराधे (इह ) यावनाचेठाईं तरुणस्त्रियांचा समुदायामधें हरिजोतो क्रीडतो तो वधूसमुदाय कशोप्रकारचा ( केलिपरे ) क्रीडेचेठाईंतत्पर ऐसा क्रीडतअसतां तो हरिकसा शोभतो तें वर्णितो चंदनेंक रून चर्चिला नीलवर्णदेहज्याचा आणखी पीतवर्ण वस्त्र ज्याचें वनमाला कंठींजाच्या ऐसा आणखी केलि ह्मणजे क्रीडा जीतीं णेकरून चंचलऐशी रत्नजडितकुंडलेंजीं तिंहींकरून मंडित ह्मणजे शोभायमान कपोल द्वयजे त्यावर स्मित ह्मणे मंदहा स्यजें तेणेंकरून शोभतो ऐसा १ (पीनेति ) काचिद्गोपव धूः ) कोणी एक गोपिकाजीती ( पीनपयोधरभारभरे



ण ) पुष्ट स्तनजे त्यांच्या गौरवातिशयेंकरून ( हरिंसरागं परिरभ्य ) श्रीकृष्णातें सप्रेम आलिंगून ( उदंचितपंचमरागं अनुगायति ) ऊर्ध्वनेला ऐसा पंचम स्वरजो त्यातें कृ- ष्णामागून गाते २ ( कापीतिकापिमुग्धवधूः ) कोणि एक सुंदर गोपिकाजीती विलास वशेंकरून चंचल नेत्रजे त्यां- च्या खेलनेंकरून निर्मिला मनोज ह्मणजे गोपिकेच्या मना

मधें कामविकार जेणेंऐसें मधुसूदनाचें मुखकमलजें त्यातें ( अधिकंध्यायति ) अतिशयें चिंतिते ३ ( कापीति ( कापिनितंबिनी ) कोणि एक स्त्रीती ( किमपिलपितुं ) कांहीं एक बोलण्या कारणे ( श्रुतिमूलेमिलिता ) कर्णासमीप जडली होत्साती ) ( पुलकैरनुकूले ) आपुल्या स्पर्शमात्रेंकरून उत्पन्न पुलकजे तिहींकरून स्वानुरागानें सूचविते ऐसे कपोल तलजें त्याचे ठाईं ( दयितं ) परम प्रिय श्रीकृष्णाजो त्यातें ( चारुचुचुंब ) बरव्याप्रकारें चुंबन देती जाली ह्मणजे कर्णामधें काहीं रहस्य बोलायाचें निमित्त करून श्रीहरीतें कपोलभागीं चुंबिती जाली हा अर्थ ४ ( केलीति ) काचित् ह्मणजे कोणि एक स्त्रीजीती ( यमुनातीरे ) यमुनाजलसंबंधि तीराचेठायीं ( मंजुलवंजुलकुंजगतं ) सुंदर वेताचें कुंज गृहजें त्याप्रति गेला ऐसा ( अमुं ) हा श्रीपतिजो यातें ( केलिकलाकुतुकेन ) कामक्रीडे

चाठाई कलाह्मणजे चातुर्यंजीं त्याविषयीं हर्षजो तेणेंकरून (कु रेणदुकूले बि. चकर्ष ) हस्तानें पीतांबरातें धरून वोढतीजाली ५ करतलेति ) रास ह्मणजे बहुतांस्त्रियांमधें नृत्यजें त्याचा रस ह्मणजे शृंगारजो त्याचेठायीं ( सहनृत्यपरायुवतिः ) आपुल्ये बरोबर नृत्यकरणार कोणी एक स्त्रीजीती ( हरिणा प्रशशंस ) हरिने जयविलास कलाकुशले हेरमणि इत्यादिक रीतीनें स्तविली तोरास रसकशाप्रकारचा करतलांचे तालजे ति हींकरून चंचल ऐशा कंकणाच्या पंक्तिज्या त्यांच्या ध्वनिनें मिश्र आहे अव्यक्त मधुर ध्वनियुक्त वेणुजो रास रसाचेठाईं ऐसा ६ श्लिष्यतीति हेराधे श्रीहरीजोतो ( कामपि श्लिष्यति ) कोण एकस्त्रियेतें आलिंगितो ( कामपिचुंबति ) कोणिएक स्त्रियेतें चुंबितो ( कामपिरामांरमयति ) कोणिएक रामा ह्मणजे स्त्रीजी तीतें रमवितो ( परांसस्मितचारुपश्यति ) आणखी कोण एकीतें मंदहास्ययुक्त बरव्याप्रकारें पाहतो, (अपरांवामामनुगच्छति ) आणखी कोणी एक सुंदरीतें अनुसरतो ७ श्रीति श्रीमंत जयदेवकविजो त्याचें हेंगीतरूप वृंदावननामक अरण्यजें त्याचेठायीं सकलस्त्रियांचा मनोरथ येकदांच पुरविला यास्तव अद्भुत ह्मणजे आश्चर्यकारि ऐसें केशवक्रीडेचे हेंरहस्य जेतें (ललितं ) अनेकरसेंकरून सुंदर

ऐसें ( यशस्यं ) यशस्कर होत्सातें ( शुभानिवितनोतु )
लोकांकारणें कल्याणातें विस्तारो ८ पुनः सखी श्लो
कत्रयें करून राधेप्रति बोलते. श्लोक विश्वेषाम
नुरंजनेन जनयन्नानंदमिंदीवरश्रेणीश्यामलकोमलै
रुपनयन्नंगैरनंगोत्सवम् स्वच्छंदंव्रजसुंदरीभिरभि
तःप्रत्यंगमालिंगितःशृंगारःसखिमूर्तिमानिवमधौमु
ग्धोहरिःक्रीडति १ हेसखि ( राधेअनुरंजनेनविश्वे
षांआनंदंजनयन् ) अनुरागेंकरून सर्वांस संतोषातें निर्मि
तहोत्साता आणखी ( इंदीवरश्रेणीश्यामलकोमलैः अंगैः
अनंगोत्सवंउपनयन् ) नीलोत्पलमालेचेपरि श्यामवर्ण
सुकुमार ऐसीं करचरणादिक अंगेंजीं तिहींकरून स्पर्शमात्रें
काममदातें उत्पन्न करित होत्साता आणखी ( व्रजसुंदरीभि
रभितःस्वच्छंदंप्रत्यंगमालिंगितः व्रजस्त्रियांहीआसमं-
तात् मनासमानेल तसा इच्छारोधनहोत्साता प्रतिअवयवाचे
ठाईं आलिंगिला ऐसा ( मुग्धोहरिः ) सुंदर श्रीकृष्णाजोतो ( मू
र्तिमान् शृंगारइवमधौक्रीडति ) मूर्तिमंत शृंगार रसाचे
परि वसंतऋतूचेठाईं खेळतो १ श्लो० अद्योत्संगवस
दुजंगकवलक्लेशादिवेशाचलंप्रालेयप्लवनेच्छयानुस
रतिश्रीखंडशैलानिलः किंचस्निग्धरसालमौलिमु

कुलान्यालोक्यहर्षोदयादुन्मूलंतिकुहूःकुहूरितिमुहुः स्ताराःपिकानांगिरः २ (हरायेअयथ्रीखंडानिलः याकाळीं मलयाचलसंबंधि दक्षिणवायु जोतो ( उत्संगवस द्भुजंगकवलक्लेशादिव ) आपले कोटरांत वसताहेत सर्पजे त्याचादंशेकरून उष्णतारूप क्लेशजो यास्तवच काय (प्रालेय प्लुवनेच्छयाईशाचलमनुसरति ) शैत्यसेवा याचे इच्छेकरू नच काय हिमाचलाप्रति जातो ह्मणजे दक्षिणेहून उत्तरगामी वायु वाहतो शीतळ मंदवाहतो तो सुखदायक होत्साता विरहि णीसतूज यासमयीं दुःखदायक जाला आहे त्याचें कारण हेच काय किंत्याचे आर्गी विषसंसर्गतो त्यासस्तव मलयाचलीं चं दन वृक्षाश्रित सर्प वर्त्तताहेत अतएव तोदाह शमायासाठीं हिमाचलाप्रति जातोकाय ऐशीउत्प्रेक्षा किंच ह्मणजे आण- खी याकाळीं ( पिकानांगिरः ) कोकिळांचे स्वर जेते ( स्नि ग्धरसालमौलिमुकुलानि आलोक्यमुहुःउन्मीलंति आई आम्रवृक्षाचेअग्रीं पुष्पकुड्मलांतें पाहून वारंवार उत्प न्न होताहेत ते स्वर कसे ( कुहूःकुहूरितितारा: ) कुहूकुहू याप्रकारेंकरून अत्यंत उच्च असे प्रकारचे २ यानंतर क विजोतो कथेचा संदर्भातें ठेऊन अध्यायाचे अंतीं आशीर्वाद रूप मंगलाचरणातें आचरितो .



श्लो॰ रासोल्लासभरेणविभ्रमभृतामाभीरवामभ्रुवामभ्यर्णेपरिरभ्यनिर्भरमुदाप्रेमांधयाराधया॥ साधुत्वद्वदनंसुधामयमितिव्याहृत्यगीतःस्तुतिव्याजादुद्भटचुंबितःस्मितमनोहारीहरिःपातुवः ३ (विभ्रमभृतां आभीरवामभ्रुवां अभ्यर्णे) शृंगार विलासातें आचरत्या ऐशा गोपांगनाज्या त्यासमीप (रासोल्लासभरेण) रासक्रीडा श्रवणें हर्षातिशयजो तेणेंकरून प्रेमांध ऐसी राधाजी तीणें (साधुत्वद्वदनंसुधामयमितिव्याहृत्य) सुंदर तुझें मुख अमृतमय ऐसें बोलुन (निर्भरमुदापरिरभ्य) अत्यंत प्रीतीनें आलिंगून (गीतस्तुतिव्याजादुद्भटचुंबितः) गायन प्रशंसेच्या मिषेंकरून स्पष्ट चुंबिला ह्मणजे अंतरीं कामवेगच कारण परंतु बाहेर गायन चमत्काराचे श्लाघेस्तवच काय चुंबिला ऐसा (स्मितमनोहारी) तीचे चुंबन चातुर्य पाहुन मंदहास्यें तीचेंच मन हरितो ऐसा हरिजोतो (वः पातु) तुह्मा भक्तातें रक्षो ३

इतिगीतगोविंदप्राकृतटीकायांसामोददामोद रोनाम प्रथमःसर्गः १

यानंतर वृत्तांत स्मरवितहोत्साता कवि बोलतो

श्लोक विहरतिवनेराधासाधारणप्रणयेहरौविग

लितनिजोत्कर्षादीर्ष्यावशेन गतान्यतः क्वचिदपिलता कुंजेगुंजन्मधुव्रतमंडलीमुखरशिखरेलीनादीना प्युवाचरहः सखीं १ साधारणप्रणयेहरौवनेविह रति ॥ इतर गोपी समाधान प्रेम धरून श्रीहरी वनामधें रा धिकेसि क्रीडतअसतां । विगलितनिजोत्कर्षादीर्ष्याव शेनअन्यतोगता ॥ इतर गोपीपेक्षां आपुल्या सौंदर्याचा उ त्कर्ष श्रीहरीनें इतरातुल्य लक्षिला यारोषवशेंकरून राधिका - अन्यत्र स्थळीं गेली होतसाती । गुंजन्मधुव्रतमंडली मुखर शिखरे क्वचिदपिलताकुंजेलीना ॥ गातआहेत भ्रमर समुदायजे तिहींकरून शब्दायमान कोणि एक लता निर्मि त कुंज गृह जे त्याचेठायीं लपाली होतसाती श्रीहरि वियोगास्तव पश्चात्तापें दीनहोऊन एकांतीं सखीप्रति बोलती जाली १

गुर्जरीरागेरूपकताले अष्टपदी॰

संचरदधरसुधामधुरध्वनिमुखरितमोहनवंशं
चलितदृगंचलचंचलमौलिकपोलविलोलवतं-
सं १ रासेहरिमिहविहितविलासं स्मरतिमनो
ममकृतपरिहासं॥ध्रु॰१ चंद्रकचारुमयूरशिखंड
कमंडलवलयितकेशं प्रचुरपुरंदरधनुरनुरंजि
तमेदुरमुदिरसुवेशं रासे॰ २ गोपकदंबनितंब



वतीसुखचुंबनलंभितलोभम् बंधुजीवमधुराधर पल्लवमुल्लसितस्मितशोभं रा० ३ विपुलपुलकभु जपल्लववलयितबल्लवयुवतिसहस्रं करचर णोरसिमणिगणभूषणकिरणविभिन्नतमि स्रं रासे० ४ जलदपटलचलदिंदुविनिंदकचंदन तिलकललाटं पीनपयोधरपरिसरमर्दननिर्द यहृदयकपाटं रासे० ५ मणिमयमकरमनोह रकुंडलमंडितगंडमुदारम् पीतवसनमनुग तमुनिमनुजसुरासुरवरपरिवारम् रासे० ६ विशदकदंबतले मिलितं कलिकलुषभयं श मयंतं मामपिकिमपितरंगदनंगदृशामनसा रमयंतम् रासे० ७ श्रीजयदेवभणितमति सुंदरमोहनमधुरिपुरूपम् हरिचरणस्मरणं प्रतिसंप्रतिपुण्यवतामनुरूपं रासे० ८

टी० ( इहरासेविहितविलासं स्मृतपरिहासं हरिंमम मनः स्मरति ) यावृंदावनीं रासमंडळीमधें विलासानें आच रून अनेक विनोदानें करिता जाला, त्या श्रीहरीतें हे सखी माझें मन स्मरतें त्या रासक्रीडे चेठाईं कसा श्री हरी शोभताजाला तें राधा सखिप्रति वर्णिते स्फुरतो अधरामृतासमान मधुर ध्वनिजो ते

णेंकरून वाजविला मोहन वेणू ज्याणें आणखी कशेप्रकारचा वेणुतें वाजवित असतां चलित ह्मणजे चंचल आहे नेत्रप्रांत ज्यास आणखी डोलतो मस्तक ज्याचा कपोल स्थळीं चंचळ कर्णाभरणें ज्याचीं ऐसा १ (चंद्रकेति) चंद्रक ह्मणजे नेत्राकार चिन्हें जिं तिहीं करून सुंदर ऐशीं मयूर पिछें जीं त्याच्या पंक्तिनें आसमंतात् मुकुटाकार वेष्टिलेत केश ज्याचे प्रचुर ह्मणजे विस्तीर्ण इंद्र धनुष्य जें तेणेंकरून आसमंतात् शोभायमान घनदाटमेघ जो तद्वत् सुंदर वेष ज्याचा २ (गोपेति) गोप समुदाय स्त्रिया ज्या गोपिका त्यांस मुखचुंबन मात्रेंकरून प्रकटविला आहे लोभ ज्याणे बंधुजीव ह्मणजे सेंद्रिचें पुष्प त्याचेपरि सुंदर आहे ओष्ठपल्लव ज्याचा ज्या ओष्ठपल्लवामध्यें स्फुरद्रूप मंदहास्य जें तेणेकरून शोभा आहे ज्याकृष्णाचे ठाई ३ (विपुलेति गोपिका स्पर्शमात्रेंकरून पुष्कल आहेत स्वेदबिंदु रोमांच ज्याचे ठायीं ऐसे बाहु पल्लव जे तिहींकरून आलिंगिलें गोपिका सहस्र जें त्यातें ज्या हरीनें करचरणादिकाचेठाई रत्नजडित कटक नूपुरादिभूषणें जीं त्याच्या प्रभेंकरून दूर केला रात्रिसंबंधि अंधकार ज्याणें ४ (जलदेति) मेघमंडलीं स्फुरद्रूप पूर्ण चंद्र जो त्याहून सुंदर चंदन तिलक ललाटीं ज्याच्या पीन ह्मणजे अत्यंत पुष्ट गोपिकांचा कुच प्रदेश जो त्याच्या मर्दनाविषयीं निर्दय-



आहे अंतःकरणज्याचें ६ (मणिमयेति मणिमय ह्मणजे रत्न खचित मकराकार सुंदर कुंडलें जीं तिहींकरून शोभताहेत दोनही गंड ह्मणजे कपोल ज्याचे उदार ह्मणे परमानंद दायक ऐसा आणखी पीतांबर धारि ऐसा अनुगत ह्मणजे आश्रयून वर्त्तले आहेत मुनि मनुष्य देवदैत्य वर परिवार जेते ज्यास ऐसा ६ (विशदेति ) विशद ह्मणजे निर्मळ कदंबाचे तळीं वर्त्तला ऐसा सकल कलिकल्मष भयातें दूर करितो ऐसा आणखी स्फुरतो मदन जीणेंकरून न ऐशा दृष्टीनें आणखी मनें करून मला चमत्कारें रमवितो त्या श्रीहरीतें ( मममनः स्मरति ) माझें मन स्मरतें हे सखी मी काय करूं ७ (श्रीजयदेवेति ) श्रीमंत जयदेवानें वर्णिलें ऐसें अति सुंदर मोहन कारक श्रीहरीचें हें रूप जेंते या काळीं पुण्यवंतास हरिचरणस्मरणाविषई योग्य होय ८ यानंतर राधाजी ती सखीप्रति कृष्णाचे ठायीं मनाची संलग्नता जी तीतें वर्णिते १

श्लो० गणयतिगुणग्रामंभ्रामंभ्रमादपिनेहतेवहतिचपरितोषंदोषंविमुंचतिदूरतः युवतिषुचलत्तृष्णोकृष्णोविहारिणिमांविना पुनरपिमनोवामंकामंकरोतिकरोमिकिं १ हे सखि माझें मन जेंतें पुनरपि मज वांचुन इतर युवतिचे ठायीं विहार करितो ऐसा चंचलाभिलाषी श्रीकृष्णाजो

त्याचेठाई इच्छेतें धरिते मीकायकरूं आणखीत्याश्रीकृष्णाच्या गुणसमूहालें चिंतितें भ्रमेंकरूनहि विस्मरणातें नआचरेत्या च्या दोषातें दूरत्यागीतें त्याच्या गुणश्रवणी परमसंतोषातें वाहतें तस्मात् मनाच्यास्वभावातें मीकायकरूं १

मालवरागेएकतालीताले अष्ट०

निभृतनिकुंजगृहंगतयानिशिरहसिनिलीय वसंतं चकितविलोकितसकलदिशारतिरभस भरेणहसंतं सखिहेकेशिमथनमुदारं रमय- मयासहमदनमनोरथभावितयासविकारं धृ० १ प्रथमसमागमलज्जितयापटुचाटुशतैर नुकूलं मृदुमधुरस्मितभाषितयाशिथिलीकृ तजघनदुकूलं सखि० २ किसलयशयननि वेशितयाचिरमुरसिममैवशयानं कृतपरिर भणचुंबनयापरिरभ्यकृताधरपानं ३ अल- सनिमीलितलोचनयापुलकावलिललिन कपोलं श्रमजलसिक्तकलेवरयावरमदन- मदादतिलोलं सखि० ४ कोकिलकलरवकू जितयाजितमनसिजतंत्रविचारं श्लथकु सुमाकुलकुंतलयानखलिखितघनस्तन

भारं सखि० ५ चरणरणितमणिनूपुरयापरिपूरितसुरतवितानं मुखरविशृंखलमेखलयासकचग्रहचुंबनदानं सखि० ६ रतिसुखसमयरसालसयादरमुकुलितनयनसरोजं निःसहनिपतिततनुलतयामधुसूदनमुदितमनोजं सखि० ७ श्रीजयदेवभणितमिदमतिशयमधुरिपुनिधुवनशीलं सुखमुत्कंठितगोपवधूकथितंवितनोतुसलीलं सखि० ८ टी० (उदारं) थोर ऐसा (केशिमथनं) श्रीकृष्णा जोतोत्यातें (मयासहरमय) मजशीं रमविं मीकसेप्रकारची मदनाचेठाई मनोरथउत्पन्न केला जीणें असेप्रकार ची तोकेशिमथनहि मदनविकारयुक्त असेप्रकारचा अनुक्रमें स्वमनोरथातें वर्णिते मी निभृत ह्मणजे गूढ ऐसें कुंज गृहजें त्याप्रति वर्तली ऐसीं तोरात्रिचेठायीं एकांतीं लपून वर्तता आणखी मी कसी सभय सकल दिशांतें विलोकिलें जीणे आणखी तोकसा रति ह्मणजे संभोगजे त्याविषयीं उत्साहातिशयें करून हंसतो ऐसा १ टी० (प्रथमेति) प्रथमसमागमी लज्जायुक्त जाली तो लज्जादूर करायासाठीं शतशः कुशलचाटुवादें करून अनुकूल वर्तता मी मंजूल-गोड गोष्टीतें बोलतें तोमाझे कटिस्थित पट्टवस्त्रातें शिथिल क-

रितोऐसा २ (किसलयेति ) मीकिसलय ह्मणजे कोमल पल्ल
व जे त्यांच्या शयनी स्थापिजेली तोचिरकाळ माझ्याच वक्षस्थ
ळीं शयन करितो ऐसा मीकेलें आलिंगनचुंबन जीणें याप्रका
रची तोमातें आलिंगून अधरपानातें करितो ऐसा ३
अलसेति ) मीस्फुरतश्रम वशेंकरून झांकिलेनलोचनजीणें
तोरोमांचसमूहेंकरून सुंदरकपोल ज्याचे ऐसा मीस्फुरतश्रम-
मजलानेव्यापिलें कलेवरजीचें ऐसी तोअत्यंतसुंदर काम मदें
करून चंचलऐसा ४ टी० (कोकिलेति ) मीकोकिलांचेपरि
मंजुलभाषणी तोसंपूर्ण कामशास्त्राच्या रहस्यातेंजाणतो
मी अस्ताव्यस्तआहेत पुष्पयुक्तकेशजीचे ऐसी तोनखेकरून
विदारिला निबिडस्तनभारजाणों याप्रकारचा ५ टी०-( च
रणेति ) मीचरणीवाजताल रत्नजडित नूपुरजीच्या ऐसी तो
परिपूर्ण केला स्फुरत विस्तारज्याणें याप्रकारचा मीवाजतेंउ-
त्तम मेखलाजीची ऐशी तोकेशग्रहणयुक्तचुंबनातें आच
रतो याप्रकारचा ६ टी० (रतीति ) मीरतिसुखसमई प्रेम
रसें मंदवर्ततें तोआनंदातिशयेंकरून स्वल्पसंकुचित नयनक
मलें ज्यांची ऐसा मीअशक्तत्वेंकरून पतनातें पावली तनुवल्ली जी
ची ऐसी तो मधुसूदन उत्पन्नकामज्याचेठाई ऐसा याप्रकारचा
केशिमथनजो त्यातें हेसखी याप्रकारचीमी राधाजीतीणेंसीर



मवीं याप्रकारें स्मरतक्रमातें करून भावितहोत्साती राधाजी
ती सखीतें प्रार्थिती जाली ७ टी॰ श्रीजयदेवेति ( पुष्कळ
आहेमधुसूदन चरितज्याचेठाई ऐसेंशृंगारलीलासहितहें कृष्ण
समागमातें इच्छितें ऐसी गोपवधू राधाजीतीचें भाषण श्रीज
यदेवानेंवर्णिलें तेंहें सर्वत्र करवातें विस्तारो ८ श्लो॰
हस्तस्त्रस्तविलासवंशमनृजुभ्रूवल्लितवल्लवीवृंदो-
त्सारिदृगंतवीक्षितमतिस्वेदार्द्रगंडस्थलं मामुद्वीक्ष्य
विलज्जितस्मितसुधामुग्धाननंकाननेगोविंदंव्रजसुंदरी
गणवृतंपश्यामिहृष्यामिच १॥ टी॰ हेसखि ( कानने ) वृंदाव
नाचेठाईं गोपिकासमुदायानें वेष्टिला ऐशा गोविंदातें पाहतें आ
णखी पाहून हर्षानें पावतें तोगोविंद कसे प्रकारचा मातें पाहून
लज्जेतें पावतो त्यालज्जेकरून युक्त मंदहास्यलक्षण अमृत
जें तेणेकरून सुंदरआहे मुख ज्याचें आणखी मातें पाहतांच ह
स्तापासून गळाला वेणू ज्याचा आणखी कुटिल भ्रूवल्ली यु
क्त गोपांगनासमुदायजो त्यावर संकेतें करून फिरविलेकटा-
क्षवीक्षणजेणें धर्मेंकरून आर्द्र गंडस्थलें ज्याचीअसे प्रकारचा
१ श्लो॰ दुरालोकस्तोकस्तबकनवकाशोकलतिकाविकाशः
कासारोपवनपवनोपिव्यथयति अपिभ्राम्यद्भृंगीरणितरम
णीयानमुकुलप्रसूतिश्चूतानांसखिशिखरिणीयंसुखयति

टी० राधिका जीती विरह शोककारणातें वर्णितें दुरालोक ह्मण जे महाव्यथाकारणें अशक्य ऐसें सूक्ष्म पुष्प गुच्छ जींचे ऐशी नूतन पल्लवित अशोकशाखा तीचा पुष्पप्रादुर्भावजो तो आण खी तटाकावरून उपवनसंबंधि वायूजो तोहि मला दुःख देतो आणखी भ्रमताहेत भ्रमरी ज्याच्या गुंजारवेंकरून रम्य आण खी (शिखरिणी) प्रशस्त अग्रें जीचीं ऐसी आम्रपु ष्पाची उत्पत्तिजीतीहि मातें विरह वशास्तवन करवविनें शि खरिणीशब्दें वृत्तनाम सूचविलें २ अध्यायांतीं जय देवकवी मंगलातें बोलतो श्लोक साकू तस्मितमाकुलाकुलगलद्धम्मिल्लमुल्लासितभ्रूवल्ली कमलीकदर्शितभुजामूलार्द्धहस्तस्तनं ॥ गोपी- नांनिभृतंनिरीक्ष्यदयितांकांचिच्चिरंचिंतयन् अंत र्मुग्धमनोहरोहरतुवःक्लेशन्नवःकेशवः ३ (साकू तस्मित) साभिप्रायमंदहास्य ज्याचेठायीं अस्तव्यस्त गळतो के श भार ज्याचेठाईं उर्ध्व फिरविल्या आहेत भ्रूलतिका ज्याचे ठा- ई कर्णकंडुयनादि छलवशेंकरून दाखविलें भुजामूळ अणखी- वितस्ति परिमित स्तनज्याचे ठाईं (मूलोर्ध्वहस्तस्तनं) हा पाठ वर्त्ततो त्याचा अर्थ भुजावरतें उर्ध्व हस्तेंकरून तन्मिषें दाखवि ले स्तनजे कीडेचे ठाईं ऐसें गोपिकाचें (निभृतं) रहस्यजें त्या

तें पाहून आपली प्रियकर कोण एक स्त्रीजी तीनें अखंड अंत रीं चिंतित होत्साता अभिनव मोहन सुंदर केशवजो तो तुमच्या क्लेशातें हरो २ ॐ ॐ ॐ

इतिगीतगोविंदेप्राकृतटीकायांअक्लेशकेशवोनामद्वितीयः सर्गः ॥ २ ॥

श्रीजयदेवजो तो याप्रकारचा पश्चात्तापातें वर्णून श्रीकृष्ण पश्चात्तापातें वर्णितो.

श्लोक कंसारिरपिसंसारवासनाबंधशृंखलां ॥ राधामाधायहृदयेतत्याजव्रजसुंदरीः १ टी॰ जसी राधा कृष्णातें स्मरतें तसाच कंसारी ह्मणजे कृष्णजो तोहि संसार वासनेचा बंधनाकारणें साक्षात् शृंखला रूप ह्मणजे बेडी राधाजी तीतें ध्यानेंकरून हृदयीं स्थापून इतर गोपिकातें त्यागिता झाला १ श्लो॰ इतस्ततस्तामनुसृत्यराधिकामनंगबाणव्रणखिन्नमानसः ॥ कृतानुतापः सकलिंदनंदिनीतटांतकुंजेनिषसादमाधवः २ टी॰ कृतानुतापः) आपण केला राधिकेचा अपमानजो त्यातें स्मरून केला आहे पश्चात्ताप जाणें ऐसा आणखी मदन बाणक्षतें करून पीडित चित्त ज्याचें ऐसा माधवजो तो राधिकेतें जेथें तेथें शोधून तीचा लाभ न होतां मग यमुनातीरीं-

कुंज गृहाचेतांई वसताजाला २

गुर्जरीरागेमतिमदताले अष्टपदी॰

मामियंचलिताविलोक्यवृत्तंवधूनिचयेन॥
सापराधतयामयापिनवारितातिभयेन॥
हरिहरिहतादरतयागतासाकुपितेव धृ॰ १
किंकरिष्यतिकिंवदिष्यतिसाचिरंविरहेण॥
किंजनेनधनेनकिंममजीवितेनगृहेण॥ह॰ २
चिंतयामितदाननंकुटिलभ्रुरोषभरेण॥शों
णपद्ममिवोपरिभ्रमताकुलंभ्रमरेण॥ हरि॰ ३
तामहंहृदिसंगतामनिशंभृशंरमयामि किंव-
नेनुसरामितामिहकिंवृथाविलपामि हरि॰ ४
तन्विखिन्नमसूययाहृदयंतवाकलयामि॥त
न्नवेद्मिकुतोगतासिनतेननेनुनयामि हरि॰ ५
पश्यसेपुरतोगतागतमेवमेविदधासि किंपु
रेवससंभ्रमंपरिरंभणंनददासि हरि॰ ६ क्ष
म्यतामपरंकदापितवेदृशंनकरोमि देहिसुंदरि
दर्शनंममसन्मथेनदुनोमि हरि॰ ७ वर्णितं
जयदेवकेनहरेरिदंप्रणतेन तिंदुबिल्वसमुद्र
संभवरोहिणीरमणेन ८ (७मामिति) ७

श्री॰टी॰ श्रीहरीचें भाषण इतर वधूमंडळीनें वेष्टिलें ऐशातें पाहून राधिका जीती निघती जाली मी तीतें निवारण करूनये परंतु मी अपराधी याभावें अत्यंत भयानें म्या तीतें ननिवारण केलें ( हरिहरि ) हाहा देवा मजपासून आदर अंतरला यामुळें कोपाभास दाखवुन राधा गेलीकीं १ ( किं करिष्यतीति ) साह्मणजे ती राधिका चिरकाळ वियोगें करून काय करील किंवा काय बोलेल हें कळेना एक राधेवाचुन मज ह्या लोक काय करितो कशाला पाहिजे किंवा याधनें करून काय होणार आहे किंवा याग्रहें करून किंबहुना जीवितें करून काय होणार २ चिंतयामीति रोषभरेण ) क्रोधातिशयें करून वक्र आहेत भ्रूलता ज्याचे ठाईं ऐसें तिचें मुखकमल जें तेंच मला स्मरतें यास्तव त्यातें मी चिंतितों तें मुख त्यास मर्यांक सें उपरि भ्रमतो भ्रमर जो तेणें करून व्याकुळ रक्तकमळ जेसें तद्वत् रक्तकमळासमान क्रोधयुक्त मुख भ्रमरासमान भ्रूलता ३ तामिति ) ध्यानवशें करून हृदयाचे ठाईं प्राप्त ऐसीती राधाजी तीतेंच अतिशयें वारंवार रमवितो माझे हृदयीं राधा असतां मी अरण्याचे ठाईं व्यर्थ कां अनुसरावें किंवा येथें व्यर्थ कां रुदन करावें ४ ( तन्वीति ) हृदयस्थ राधेप्रति भगवान् बोलतो ( हेतन्वि ) हे सुंदरी तुझें हृदय जें ते म

१९२०६०

सरेंकरून खिन्न ऐसी मीतर्कितों तूं कोठें गेलीस तें मी नेणें तुं सहज जा
ती जालीसऐसें समजून मीन प्रार्थिता जालों ५ पश्यसेइति।
तूं मातें पाहातेस मजपुढें पुनःपुना वेरझारा करितेस परंतु पूर्वव
त् सप्रेम आलिंगनातें कानदेसि ६ क्षम्यतामिति। हे राधे त्वां म
जवर क्षमाकरावि मी यानंतर तुझाअसा अपराध कदापि करणा
रनाही हे सुंदरी मजदर्शन द्यावें मी मदनेंकरून दुःखी आहें ७
।श्रीजयदेवेति। याप्रकारें हें श्रीकृष्ण भाषणजेंतें तिंदुबिल्व
नामक माझें कुळजें तोचकोणि एक समुद्र त्यापासून जन्मलों चंद्रास
मान श्रीजयदेव कविजो हरीचा भक्तत्याणें वर्णिलें ८

श्लो॰ भ्रूपल्लवोधनुरपांगतरंगितानिबाणागुणाः
श्रवणपालिरितिस्मरेण तस्यामनंगजयजंगम
देवतायामस्त्राणिनिर्जितजगंतिकिमर्पितानि १

टी॰ अनंग ह्मणजे मदनजो त्याची त्रैलोक्य जयहेंतुभूत जंग-
मदेवताच काय ऐसी राधाजी तीचेठाईं मदनजो त्याणें आपलिं
जिंकिलें जग जिंहीकरून ऐसीं शस्त्रेंजीतीं स्थापिलीकाय जा
स्तव तीचा भ्रूपल्लवजो तो मदनाचें धनुष्य होय कटाक्ष निरीक्षणें
जीतीं बाणहोत श्रवण कोणजोतो धनुष्याचा गुण होय १
यानंतर श्रीकृष्णजोतो राधेच्या वियोगेंकरून उत्पन्न संतापजो
तत्परिहारार्थ आंगीधारणकेलें शीतळ चंदनादिक पदार्थजे त्या



तें पाहून मीरुद्र ऐसें समजोन मदन मला अधिकच पीडितो काय, ऐसा तर्क करित होत्साता मदनाप्रति बोलता जाला तें कवी वर्णितो॥१ श्लो॰ हृदिबिसलताहारोनायंभुजंगमनायकः कुवलयदलश्रेणीकंठेनसागरलद्युतिः मलयजरजोनेदंभस्मप्रियारहितेमयिप्रहरनहरभ्रांत्यानंगक्रुधाकिमुधावसि २ (हेअनंगप्रियारहितेमयिहरभ्रांत्यानप्रहर) हे मदना राधारहित मीजो त्या मा झेठाई हा आपुला शत्रू महादेवहोय ऐशी कल्पनाकरून मातें नको-मारूं (क्रुधाकिमुधावसि) मजवर क्रोधेंकरून कां धावतोस आपण महादेव नव्हें हेंस्थापितों हेमदना (हृदिबिसलताहारोनायंभुजंगमनायकः) दाहशमनार्थ हृदयाचेठाईं शीतल मृणालांचा हार मीधारण केला हा महादेवाचा वासुकी नव्हे (कंठेकुवलयदलश्रेणी) कंठी नीलोत्पलाच्या दलांची माळ हीवर्त्तते (नगरलद्युतिः) ही विषाची कालिमा नव्हे (इदंमलयजरजः नभस्म) हा श्वेत चंदनाचा लेपहोय हाविभूतीचालेपनव्हे तूं हेरुद्राचें आभरण ह्मणुन समजलास काय हें शेषकल्पावें २ यानंतर राधेचा विरहें अधिकच कामपीडाजी तत्परिहारार्थ मदनातें प्रार्थितो,

श्लोक पाणौमाकुरुचूतसायकममुंमाचापमारोप

यत्क्रीडानिर्जितविश्वमूर्छितजनाघातेनकिंपौरुषम्॥
तस्याएवमृगीदृशोमनसिजप्रेंखत्कटाक्षानिलज्वाला
जर्जरितंमनागपिमनोनाद्यापिसंधुक्षते ३ (हेक्री
डानिर्जितविश्व) लीलामात्रें जिंकिलें विश्व जेणें याप्रकारचा
हे मदना (पाणौ अमुंचूतसायकंमाकुरु) कराचेठाईं याआ
म्रपुष्पबाणातें नकोधरूं ह्मणजे लीलेंकरूनच सर्वांतें जिंकूं शके
तो तो तूं शस्त्रेंकरून मला कसा देविशील यास्तव शस्त्र नधरावें
हा अर्थ आम्रपुष्पजेतें मदनाचा बाण होय हें शास्त्रामधें प्रसिद्ध
असे (माचापमारोपय) हे मदना नकोधनुष्यातें सज्जकरूं
(मूर्छितजनाघातेनकिंपौरुषम्) मूर्छितजनाकारणें मार
णेंकरून कोणतापुरुषार्थ ह्मणजे मीराधेच्या वियोगें सहज मूर्छ
प्राय त्यामला मारून कोणती कीर्ती इच्छिली या अभिप्रायातें व
र्णितो (तस्याएवमृगीदृशोमनसिजप्रेंखत्कटाक्षानलज्वा
लाजर्जरितंमनः अद्यापिमनागपिनसंधुक्षते) ती मृग
नयनाराधाजी तीच्या मदनविकारेंकरून मजवर संचरला नेत्र
कटाक्षजो तो कोणि अग्नि त्याचेज्वालेनें जर्जर जालें ऐसें माझें
मन जें तें अद्यापि काहि अंकुरित होत नाहीं ३ हृदयस्थराधेप्र
ति भगवान् बोलतो.

श्लोक॥ भ्रूचापेनिहितःकटाक्षविशिखोनिर्मातुम

र्मव्यथांश्यामात्माकुटिलःकरोतुकबरीभारोपिमारोद्यमम्॥ मोहंतावदयंचतन्वितनुतांबिंबाधरोरागवान्सद्वृत्तस्तनमंडलस्तवकथंप्राणैर्ममक्रीडति ४.

हेराधे १ भ्रूचापेनिहितःकटाक्षविशिखोमर्मव्यथांनिर्मातु २ तुझी भ्रूलताजी तेंच कोणियेकचा पत्याचेठाई स्थापिला नेत्र कटाक्ष रूप बाणजोतो मर्मव्यथेतें निर्माण करो ज्यास्तव मर्मे तोडावीं हा बाणाचा स्वभाव होय आणखी श्यामात्माकुटिलःकबरीभारोपिमारोद्यमंकरोतु ३ शाम वर्ण आत्मा तिनें वक्र ऐसा हा केशांचा समूह जोतोहि मदनाच्या उद्यमातें करो, ह्मणजे मदन जसा मारितो तसा मारायाचा यत्न करो ज्यास्तव काळाकुटिल पुरुष जोतो शत्रुचेंपरि आचरतो ४ हेतन्वि अयंरागवान् बिंबाधरश्चतावत् मोहंतनुतां ५

हेराधे हारागवान् १ ह्मणजे आरक्त ऐसा तुझा बिंबा फळासमान अधरोष्ठ जोतोहि संपूर्ण मोहातें रचो ज्यास्तव रागवान् ह्मणजे विषयासक्त पुरुष जोतो मोहालेंनिर्मितोच ८ तवसद्वृत्तस्तनमंडलः ममप्राणैःकथंक्रीडति २ तुझा सुंदर वर्त्तुळ ऐसा स्तन गोलक जोतो माझे प्राणजे तिहींसी कसा खेळतो माझे प्राण हरायाकारणें कसा पाहतो ज्यास्तव सद्वृत्त ह्मणजे उत्तम शीळवंत जोतो पराचा घातन इच्छि राधेचेकटाक्षादिक चिं

तून अधिकच विरह पीडेतें अनुभवितो हा अभिप्राय ४
पूर्वी राधेच्या संगेंकरून ज्या विषयसुखातें अनुभवित होतो
तेंच विषयसुख राधेचें रूप ध्यातां मज प्राप्त आहे परंतु वियोग
पीडा शमन होय याचें कारण कळेना ऐसें आतां श्रीहरी बोल
तो. श्लोक तानिस्पर्शसुखानि
**तेचतरलस्निग्धादृशोर्विभ्रमास्तद्वक्त्रांबुजसौरभं**
**सचसुधास्पंदीगिरांवक्रिमा साबिंबाधरमाधुरीति**
**विषयासंगेपिमन्मानसं तस्यांलग्नसमाधिहंतवि**
**रहव्याधिःकथंवर्त्तते** ५ टी॰ जीं पूर्वी प्रत्यक्ष स्पर्श सु
खें अनुभविलीं होतीं ( **तानिस्पर्शसुखानि** ) या ध्यान
काळीं तींच हीं स्पर्श सुखें ( **तेचतरल स्निग्धादृशोर्वि**
**भ्रमाः** ) तेच किं हे चंचळ स्नेहयुक्त दृष्टीचे विलास वर्त्तता
हेत येणेंकरून रूपविषय कथिला ( **तद्वक्त्रांबुजसौरभं**
तेंच किं हें मुखकमळाचे सुगंधत्व ( **सचसुधास्पंदीगिरां**
**वक्रिमा** ) तेंच किं हें अमृतातें स्रवतें ऐसें शब्दाचें वक्रत्व
येणें शब्द विषय कथिला ( **साबिंबाधरमाधुरी** ) तीच हे
बिंबाधराची मधुरता ह्मणजे अधरामृताची गोडी येणे र
स विषय कथिला ( **इतिविषयासंगेपि** ) या प्रकारें राधे
पासून विषयाचा योग वर्तला असतांहि ( **तस्यांलग्नस**—



माधिमन्मानसंते ) राधेचे ठायीं लागला समाधी ह्मणजे एकाग्रताजास ऐसें माझें मन वर्ततें ऐसें असतांहि ( हंतविरहव्याधिः कथंवर्त्तते ) हा विरह रोग कसा वर्ततो, ज्यास्तव समाधियुक्तास रोग वर्त्तूं नये आणखी ज्याचें ठाईं मनाचा योग त्याच मनास त्याचा वियोग रोग कसा हा अभिप्राय ५ कविजोतो अध्यायांनीं भक्ताप्रति आशीर्वादातें देतो, श्लोक तिर्यक्कंठविलोलमौलितरलोत्तंसस्यवंशोच्चरद्गीतस्थानकृतावधानललनालक्षैर्नसंलक्षिताः संमुग्धंमधुसूदनस्यमधुरेराधामुखेंदौ मृदुस्पंदंपल्लविताश्चिरंददतुवःक्षेमंकटाक्षोर्मयः ६ टी० वेणुतें वाजवित असतां तिर्यक् ह्मणजे वांकडा कंठ ज्याचा डोलतो मस्तक ज्याचा चंचळ उत्तंस ह्मणजे तुरा ज्याचा ऐसा मधुसूदन जो त्याचे ( मधुरेराधामुखेंदौसंमुग्धंमृदुस्पंदंपल्लविताः ) सुंदर ऐसा राधेचा मुखचंद्र जो त्यावर गुप्तसें काहीं चंचलत्व विस्तारिलें ऐसें ( कटाक्षोर्मयः ) कटाक्षरूप तरंग जेते ( वःक्षेमंचिरंददातु ) तुह्मास कल्याणातें चिरकाळ देवोत चंद्राच्यादर्शन लहरी जशा तद्वत् राधा मुखचंद्रदर्शनीं कृष्णाची अपांगदर्शनें जीतीं वृद्धितें पावताहेत तीं भक्तांस कल्याण करोत हा अर्थ सकळ स्त्रियां

मध्यें राधिकेतेंच कटाक्षें अवलोकित असतां इतरांहिं मत्सर क
र्मा न केला हे आशंकेनें बोलतो त्या कटाक्ष लहरि कसे प्रका
रच्या (**वंशोच्चरद्गीतस्थानकृतावधानललनालक्षैर्न संलक्षिताः**) वेणुपासून प्रकटलेल गायनाचे प्रभेदजे त्यांव
र केली आहे एकाग्रता ज्यांहीं ऐसी गोपिकाची लक्षेंजीं त्याहीं
न अवलोकिल्या अशोप्रकारच्या ६

इतिगीतगोविंदेप्राकृतटीकायांमुग्धमधुसूदनोनाम
तृतीयःसर्गः ३

यानंतर कविजोतो राधिकेची सखी कृष्णाप्रति येउन बो
लायाकारणें प्रवर्त्तलीतें बोलतो

**श्लोक ॥ यमुनातीर वानीरनिकुंजेमंदमास्थितम् ॥ प्राहप्रेमभरोद्भ्रांतंमाधवंराधिकासखी ॥ १ ॥** टीः
यमुनेच्यातिरीं वानीरनिकुंज म्हणजे वेताचें कुंजगृहजें त्याचे
ठाईं (**मंदमास्थितं**) चिंताग्रस्त बसलाऐसा (**प्रेमरसोद्भ्रांतं**)
राधिकेचेठाईं प्रेमातिशयेंकरून भ्रमित ऐसा माधवजो त्या
प्रति राधिकेची सखीजीतीप्राह बोलती झाली १

**कर्णाटकरागेएकतालीताले अष्ट०**

राधेप्रति सखीचें भाषण

**निंदतिचंदनमिंदुकिरणमनुविंदतिखेदमधीरं**

व्यालनिलयमिलनेन गरलमिवकलयतिमलय
समीरं साविरहेतवदीना माधवमनसिजविशि
खभयादिवभावनयात्वयिलीना ॥ धृ० १ अवि
रलनिपतितमदनशरादिवभवदवनायविशा
लं स्वहृदयमर्मणिवर्मकरोतिसजलनलिनी
दलजालं ॥ २ ॥ सावि० ॥ कुसुमविशिखशर
तल्पमनल्पविलासकलाकमनीयं व्रतमिवतवप
रिरंभसुखायकरोतिकुसुमशयनीयं सावि०
३ वहति चचलितविलोचनजलधरमानन
कमलमुदारं विधुमिवविकटविधुंतुददंतदल
नगलितामृतधारं ॥ सावि० ४ विलिखतिरह
सिकुरंगमदेनभवंतमसमशरभूतं प्रणमति
मकरमधोविनिधायकरेचशरंनवचूतं सावि०
५ प्रतिपदमिदमपिनिगदतिमाधवतवचर
णेपतिताहं त्वयिविमुखेमयिसपदिसुधानि
धिरपितनुतेतनुदाहं सा० ६ ध्यानलयेनपुरः
परिकल्प्यभवंतमतीवदुरापं विलपतिहसति
विषीदतिरोदितिचंचतिमुंचतितापं सावि० ७
श्रीजयदेवभणितमिदमधिकंयदिमनसान

टनीयम् हरिविरहाकुलवल्लवयुवतिसखीवचनं पठनीयं ॥ ८ टि० (निंदतीति हेमाधव सातववविरहेदीना) हेमाधवा तीराधा तुझा वियोग प्राप्त असतां दुःखि आहे आणखी (मनसिजविशिखभया दिवभावनयात्वयिलीना) कामबाणाचा भयास्तवच काय एकाग्रतेंकरून तुझे गंई प्रवेशलीआहे ह्मणजे मदन शत्रूच्या भयेंकरून ध्यानाच्या मिषें तुझ्या स्वरूपीं लपून राहिलीच काय ॥ जास्तव तुजहून भिन्न वर्तेना हाअर्थ आणखी चंदनंनिंदति) दाह शमनार्थ आह्मीं सर्वांगीं चर्चिलें चंदन जें त्यातें निंदिते जळोहें चंदन येणें करून दाह अधिकच होत असतो इत्यादिक बोलतें (इंदुकिरणमन्वधीरंखेदविंदति) संताप शमनार्थ आह्मी चंद्रकिरणी नेली असतां चंद्र किरणातें पाहून पुष्कळ खेदातें पावते ह्मणजे शीतळ किरण होत्सातें तव वियोगें करून अग्नि ज्वालेचेपरि भासताहेत १ आणखी मंद शीतळ सुगंध ऐसा मलय समीर ह्मणजे दक्षिण वायु जो त्यातें (व्यालनिलयमिलनेन) मलयाचलीं सर्प स्थानजें त्याचा संसर्गेंकरूनगरलमिव कलयति) हा वायू नव्हे हें गरलच होय एसें जाणतें १ (अविरलेति) हेमाधवा राधिकाजीती (स्वहृदयमर्मणि) दाहशमनार्थ-



हृदय मर्मस्थळाचे ठाई (सजलनलिनीदलजालं विशालंव र्मकरोति) जलयुक्त कमलिनी पत्रसमूहातें आणून विशा ल कवच्याचे परि स्थापिते तें कमलिनी पत्ररूप कवचे जेतें (अविरलनिपतितमदनशरात्) अखंडहृदयीं प्रवेश ताहेत मदनाचे बाणजे त्यापासून (भवदवनायइव) हृद यीं वर्तला तूं जो त्याचा रक्षणार्थच काय तें कवच रचिलें २ (कुसुमेति) हे माधव अनल्पविलासकमनीयं) अ नेक लीला चातुर्ये सुंदर ऐसें (कुसुमशयनीयंकरोति) पुष्पमय शयनातें रचितें परंतु तुझ्यावियोगास्तव तें शयन व्य व्यर्थ होत्सातें लोह बाणाचे परि दुःखदायक वर्तलें आहे यास्त व हे कृष्णा (तवपरिरंभसुखायकुसुमविशिखशरत ल्पं) तुझें आलिंगन सुखप्राप्त व्हावें एतदर्थ मदन बाणाचा तल्पजो तद्रूप (व्रतमिव) व्रतातेंच काय आरंभिते पुष्पंम दनाचे बाणहोत त्यांची शय्यालें शरपंजर होय तस्मात् शर पंजरव्रतातें आचरते काय ३ (वहतीति) हेमाधवा ती राधिका जीती (चलितविलोचनजलधरं) गळालें नेत्रांतून जळ नेंत्यातेंधरितें ऐसें (उदार मानन कमलंवह ति) सुंदर मुखकमलातें वाहतें कोणाचेपरि (विकटविधुं तुददंनदलनगलितामृतधारं विधुमिव) क्रूर ऐसा रा

हु जो त्याच्या दंतविदारणें करून गळतात अमृत धारा ज्या चंद्रापासून ऐसा चंद्रमा जो त्यातेंच काय वाहतें अमृतमय चंद्रमंडल जें त्यातें राहूनें ग्रासितां त्यांतून अमृत धारा जसी निघायास योग्य तद्वत् ( तव ) वियोग चिंतेने ग्रासिलें तिचें मुखजें त्यावरून नेत्रसंबंधि जळ धारा निघते ह्मणजे वियोग चिंतेनें अत्यंत रडून करिते हा अर्थ ४ ( विलिखतीति हेमाधवा राधाजीतीं ( रहसि कुरंगमदेन ) असम शरभूतंभवंतं विलिखति ) एकांतीं कस्तुरीने मदन रूपातें तुतें लिहिते आणखी अधोमकरंकरेनवचूतंशरंचविनिधायप्रणमति ) खालीं मकरातें लिहून करीनवाम्र पुष्परूप बाणातें लिहून वंदिते, ह्मणजे मकरवाहन युक्त पुष्पबाण युक्त मदन मूर्तितें कस्तूरीने लिहून तिचे ठाईं तूतें चिंतून उपासना करिते हा अर्थ ५ ( प्रतिपदमिति ) हेमाधव अहंतवचरणेपतिताइतिप्रतिपदंनिगदति ) हेमाधवा मीशरणागत होउन तुझ्या चरणावर पडली आहें ऐसें वारंवार बोलते ( त्वयिविमुखे सपदिसुधानिधिरपि ) तूं विमुख वर्त्तला असतां तत्क्षणी च चंद्रमाजो तोहि ( मयितनुदाहंतनुते ) माझेठाईं देह दाहातें रचितो ६ ( ध्यानलयेनेति हेमाधवा ( राधिकाअतीवदुरापंभवंतं ध्यानलयेनपुरःपरिकल्प्यविलप

ति ) अत्यंत दुर्लभ जो तूं त्यातुलें ध्यानाच्या एकाग्रतें करून आपुले पुढें कल्पून विलापाते ह्मणजे ध्यानाचे ठायीं तुझें रूप कल्पून तूं उपेक्षिलें तें स्मरून तुज पुढें रोदन करित असे हा अर्थ आणखी ( हसति ) तूं मृषा वाक्यें समाधान करितोस ऐसें कल्पून हांसले हा अभिप्राय ( विषादति ) खेद करिते ह्मणजे आपण केला अन्याय जो त्यातें आपणाच स्मरून पश्चात्ताप करिते हा अभिप्राय ( रोदिति ) पश्चात्तापाच्या अतिशयें रूदन करिते ( चंचति ) शरण जाले ( तापंमुंचति ) याप्रकारें विरह तापातें त्यागिते ७ ( श्रीजयदेवेति ) यदिमनसाअधिकंनटनीयम् ) जरि मनें करून अधिक नाचायाकारणें इछिलें ह्मणजे अहोलोक हो हृदयाचे ठाईं हर्षातें इछिलें तर्हि ( जयदेवभणितमिदं ) श्रीमंत जयदेवानें वर्णिलें हें ( हरिविरहाकुलबल्लवयुवतिसखीवचनम् ) हरिवियोगें व्याकुल ऐसी गोपांगना राधाजीतीचे सखीचें वचन जें तें ( पठनीयं ) पढावें ८

कृष्णाप्रति दूतिका बोलते.

श्लो॰ आवासोविपिनायतेप्रियसखीमालापिजालायते तापोविश्वसितेनदावदहनज्वालाकलापायते साविवहविरहेणहंतहरिणीरूपायतेहा

कथं कंदर्पोपि यमायते विरचयन् शार्दूळविक्रीडि
तम् १ (हे कृष्णा सा त्वद्विरहेण हरिणीरूपायते)
हे माधवा ती राधिका तव वियोगेंकरून हरिणी रूपाचे परि
वर्त्तते ह्मणजे मृगीचे परि दैन्य पावली आहे तें कसें सांग
तों (आवासो विपिनायते) गृह जें तें अरण्याचे परि भा
सतें (प्रियकरसखीमालापि जालायते) प्रियकर स
खियांची पंक्ति जी तीहि जालाचे परि वाटते ह्मणजे मृगीस
धरायाचे जाळें जसें तद्वत् तीला सखिसमुदाय भयंकर वा
टतो हा अभिप्राय (तापोपि श्वसितेन) देह संतापहि श्वा
स वायूकरून (दावदहनज्वालाकलापायते) दावानळा
च्या ज्वाला ज्या त्यांचा समुदायाचे परि भासतो ह्मणजे मृगी
कारणें अरण्याग्निज्वाला जशा न हून श्वास जे ते देह संतापाच्या
ज्वाला होत (हा कथं) अहा कोणत्या प्रकारेंकरून (कंदर्पो
पि शार्दूलविक्रीडितं विरचयन्) मदन जो तो ही व्या
घ्राच्या खेळातें रचित होत्साता (यमायते) यमाचे परि आच
रतो ह्मणजे सुखकारि मदन जो तोहि कोणत्या अदृष्टेंकरू
न मृगीतें व्याघ्र जसा तसा भयंकर वर्त्तलो तें कळेना शार्दूल
विक्रीडित या शब्देंकरून छंदाचें नाम सुचविलें १
यानंतर सखी जी ती राधेच्या कृशातें गीतेंकरून वर्णिते.

धेच्या मुखातें पाहत होत्साता अतिशयें करून मंदहास्ययुक्त जालें मुख ज्याचे ऐसा हा नंदपुत्र श्रीकृष्ण जो तो जगाच्या आनंदार्थ असो २ ॥ इतिगीतगोविंदेप्राकृत टीकायांविलक्षलक्ष्मीपतिर्नामाष्टमःसर्गः ८ छ

यानंतर सखी राधेतें उपदेशिती जाली ऐसें कवि वर्णितो आर्या ॥ ॥ अथतांमन्मथखिन्नांरतिरसभिन्नां विषादसंपन्नां ॥ अनुचिंतितहरिचरितांकलहांतरितामुवाचसखी १ टी० — यानंतर मदनविकारें खिन्न शृंगाररसें भिन्न यास्तव विषादें करून संपन्न ऐसी अनुचिंतिलें हरिचें कर्म जीणें ( कलहांतरितां ) ह्मणजे पतिच्या अवमानातें आचरून पुनः पश्चात्तापातें पावली ऐसी राधाजी तीतें सखी बोलती जाली १ राधेप्रति सखीची प्रार्थना,

गुर्जरीरागेरूपकताले अष्ट०

हरिरभिसरतिवहतिमधुपवने किमपरमधिक सुखंसखिभवने माधवेमाकुरुमानिनिमानमयेधृ० १ तालफलादपिगुरुमपिसरसं किंविफलीकुरुषेकुचकलशं किमाधवे० २ कतिन कथितुमिदमनुपदमचिरं मापरिहरहरिम

तिशयरुचिरं माध० ३ किमितिविषीदसिरोदिषि विकला विहसतियुवतिसभानवसकला माध० ४ स जलनलिनीदलशीलितशयने। हरिमवलोकयसफल नयने माध० ५ जनयसिमनसिकिमितिगुरुखेदं शृणुममवचनमनीहितभेदं माध० ६ हरिरुपयातु वदतुबहुमधुरं किमितिकरोषिहृदयमितिविधुरं माधवे० ७ श्रीजयदेवभणितमतिललितं सुखयतु रसिकजनंहरिचरितं माध० ८

टी० — (हरिरिति अयेमानिनिमाधवेमानंमाकुरु) हे अभिमानवती राधे माधवाचेठाईं मानह्मणजे कृष्णापराध सूचक ईर्ष्यावशें कोपनकोकरूं माधवशब्दें करून लक्ष्मीभ- र्ता होत्साता तुतें प्रार्थितो यास्तव त्यावर हा रोष अनुचित हो य (हरिरभिसरति) हरिस्वयेंच तुझ्या संकेतस्थळीं येतो ऐ सें असतां आणखी (मधुपवनेंवहति) वसंतवायुवाहत असतां (हेसखि) राधे (भवनेअपरमधिकसुखंकिं) गृहाचेठाईं याहुन अधिक सुख कोणतें स्वयें आला श्रीहरी जो त्यावरकोपकरून त्याविना गृहीं जाउन कोणतें सुख इ- च्छिलें १ (तालफलादिति) तालफळाहुन अधिक अत्यंत सरस ऐसा कुचकलशजोत्यातें श्रीहरीच्या परित्यागें (किंवि



फलीकुरुषे ) कांनिष्फलकरितेस २ ( कलितेनेति )
अतिशयरुचिरंमापरिहरेत्यनुपदमचिरं कतिनकथि
तं ) अतिशयें सुंदर ऐशा हरीतें नको त्यागूं ऐसें मागें सांप्रत
ही कितिवेळ न कथिलें काय वारंवार कथिलेंच आहे ३
( किमितीति ) विकला ह्मणजे अस्तव्यस्त होत्साती
किमितिविषीदसिरोदिषि ) कांविषादातें करितेस कां र
डतेस ( सकलायुवतिसभातवहसति ) संपूर्णस्त्रिया
चा समुदाय तुला हांसतो ४ ( सकलेति ) हे राधे सजल
ह्मणजे जलयुक्त कमलिनी पत्रेंजीं तिहीं रचिलें शयनजें
त्यांवर याहरीतें पहा आणखी ( नयने सफलय ) नयना
तें सफलकर ५ ( जनयसीति ) मनसिगुरुखेदंकि
मितिजनयसि ) मनाचेठाई पुष्कल खेदानें कांउत्पन्न करि
तेस ( अनीहितभेदंममवचनंशृणु ) नआकांक्षित आ
हेत भेदजेणेंकरून ह्मणजे उभयतांचे ऐक्यकारक ऐशा मा-
झ्या वचनातें ऐक ६ ( हरिरिति ) हरिरुपयातु ) ह
री शयनगृहीं तुजसमीपजावो ( बहुमधुरंवदतु ) अतिम
धुरसमाधान वचनातें बोलो ( किमितिहृदयंअतिवि
धुरंकरोषि ) कांहृदयातें अत्यंत खिन्न करितेस ८
श्रीजयदेवेति ) श्रीजयदेवानें बोलिलें ऐसें हें सुंदर हरि

चरित रसिकजनातें सुखीकरो ८

पुनरपि राधेप्रति सखी बोलते,

श्लोक॥ ॥ स्निग्धेयत्परुषासियत्प्रणमतिस्तब्धासि यद्रागिणिद्वेषस्थासि यदुन्मुखेविमुखतां यातासि तस्मिन्प्रिये तद्युक्तंविपरीतकारिणितवश्रीखंडचर्चाविषं शीतांशुस्तपनोहिमंहुतवहःक्रीडामुदोयातनाः १ टी.-( तस्मिन्प्रियेस्निग्धेयत्परुषासि ) तोभर्त्ता श्रीकृष्णस्नेहें मधुरबोलत असतां ज्यास्तव तूं निष्ठुर वर्त्ततेस ( तस्मिन्प्रणमतियत् ) तो नमस्कारातें आचरत असतां ज्यास्तव तूं स्तंभाचेपरि उगीच उभी राहतेस ( तस्मिन्रागिणि यद्वेषस्थासि ) अनुरागयुक्त असतां तूं द्वेषाचे ठायीं वर्ततेस ( उन्मुखेयत् विमुखतांयातासि ) तो सन्मुख वर्त्तला असतां ज्यास्तव तोंड फिरउन बसतेस ( तत् हे विपरीतकारिणितवश्रीखंडचर्चाविषं शीतांशुस्तपनः हिमं हुतवहः क्रीडामुदोयातनाः इतियुक्तं ) त्याकारणास्तव हे विपरीत कारिणि राधे तुज चंदनाची कथा विष होते चंद्रमा सूर्य होतो हिमजेतें अग्निरूप होतें क्रीडासुखेंजीं तीं तीव्र वेदनारूप होत हें सर्व युक्त आहे १

यानंतर कवि जो तो अध्यायांती मंगलातें रचितो,

श्लोक ॥ ॥ अंतर्मोहनमौलिघूर्णनचलन्मंदारविस्रंसनः स्तब्धाकर्षणदृष्टिहर्षणमहामंत्रः कुरंगीदृशां दृप्यद्दानवदूयमानदिविषद्दुर्वारदुःखापदां भ्रंशः कंसरिपोर्व्यपोहयतुवोश्रेयांसिवंशीरवः २ कुरंगीदृशां ( मृगनयना गोपिकाज्या त्यांच्या मनो मोहाविषयीं मौलिघूर्णन ह्मणजे साधुसाधुशब्दें शिरः कंपनजें तेणेंकरून चंचल ऐसीं मस्तकीं गुंफिलीं मंदारपुष्पेंजीं त्याच्या गळण्याविषयीं स्तब्धचरणादिक अवयवांच्या आकर्षणाविषयीं दृष्टीच्याहर्षाविषयीं महामंत्र ह्मणजे सद्यः अनुभवदेणारासिद्ध मंत्ररूप आणखी ईर्षायुक्त दानवजेत्याहीं पीड्यमान ऐसे दिविषत् ह्मणजे देवजे त्यांच्या अनिवार्य दुःखापत्तीज्या त्यांच्या भ्रंश ह्मणजे नाशक ऐसा कंसरिपुचा वंशीरवजो ह्मणजे श्रीकृष्णाचा वेणुनादजोतो ( वः अश्रेयांसिव्यपोहयतु ) तुह्मी भक्तजनजे त्यांच्या अमंगळातें खंडनकरो २

इतिगीतगोविंदेप्राकृतटीकायांसुग्धमुकुंदवदनोनाम नवमः सर्गः ९ छ छ

श्लो० ॥ ॥ अत्रांतरेमसृणरोषवशामसीमनिश्वासनिःसहमुखींसुमुखीमुपेत्य सव्रीडमीक्षितसखीवदनांदिनांतेसानंदगद्गदपदंहरिरित्युवाच १

टी० — यासमयीं ( अमसृणरोषवशां ) कर्कश क्रोधाधीन ऐसी ( असीमनिःश्वासनिःसहमुखीं ) अत्यंत निश्वासवशें असह्य मुखजीचें ह्मणजे सकोपवदना राधाजी तीतें ( दिनांते स्मेरमुखीमुपेत्य ) सायंकाळीं प्रसन्न वदना ऐशी ते पाहुन तीप्रति जाउन ( हरिः सानंदगद्गदपदंइत्युवाच ) श्रीहरि आनंदयुक्त गद्गद भाषणपूर्वक याप्रकारें बोलताजाला तीराधाकसी ( सव्रीडमीक्षितसखीवदनां ) पश्चात्तापें लज्जायुक्त पाहिलें आहे सखीचें वदनजीणे ऐसी ह्मणजे याच्या चमत्कारानें पाहिलेंकीं ऐसेंसूचनार्थ दूतिकेच्या मुखातें पाहते असे प्रकारची १

राधेप्रतिश्रीहरीचेभाषण

देशवराडीरागेअडवताले अष्ट०

वदसियदिकिंचिदपिदंतरुचिकौमुदीहरतिद
रतिमिरमतिघोरं स्फुरदधरसीधवेतववदन-
चंद्रमारोचयतिलोचनचकोरं प्रियेचारुशी
लेमुंचमयिमानमनिदानं सपदिमदनानलोदह
तिममस्मानसंदेहिमुखकमलमधुपानं धृ० १
सत्यमेवासियदिसुदतिमयिकोपिनीदेहिख
रनखरशरघातं घटयभुजबंधनंजनयरद



खंडनंयेनवाभवतिस्फुरखजातं प्रियेचारुशीले
मु० २ त्वमसिममभूषणंत्वमसिममजीव
नंत्वमसिममभवजलधिरत्नं भवतुभवतीह
मयिसततमनुरोधिनीतत्रममहृदयमतिय
त्नं प्रिये० ३ नीलनलिनाभमपितन्विलवलो
चनंधारयतिकोकनदरूपं कुसुमशरबाणभा
वेनयदिरंजयसिकृष्णमिदमेतदनुरूपं प्रिये० ४
स्फुरतुकुचकुंभयोरुपरिमणिमंजरीरंजयतुतवहृ
दयदेशं रसतुरशनापितवघनजघनमंडलेघोषय
तुमन्मथनिदेशं प्रिये० ५ स्थलकमलगंजनं
ममहृदयरंजनं जनितरतिरंगपरभागं घन
घनमसृणवाणिक रवाणिचरणद्वयंसर
सलसदलक्तकरागं प्रिये० ६ स्मरगरलखंड
नंममशिरसिमंडनं देहिपदपल्लवमुदारं ज्व
लतिमयिदारुणोमदनकदनानलोहरतुत
दुपहितविकारं प्रिये० ७ इतिचटुलचाटुप
टुचारुमुरवैरिणोराधिकामधिवचनजातं ज
यतिजयदेवकविभारतीभूषितंमानिनीज
नजनितशातं प्रिये० ८ ( वदसीति )

हेचारुशीलेप्रियेमयिअनिदानंमानंमुंच ॥ चारुशी
लें ह्मणजे मनोहरस्वभाव जीचा याप्रकारचे हेप्रिये माझेठाईं
अकारण रोषातें त्याग ॥ सपदिमदनानलोभमममानसंदह
ति ॥ यासमयीं मदनाग्नी जोतो माझ्या चित्तातें दाह करितो
यास्तव ॥ मुखकमलमधुपानंदेहि ॥ मुखकमल संबंधि
अधरामृत लक्षण मधुपानातें द्यावें ॥ ॥ हेराधेत्वं किंचिद
पियदिवदसि नहिदंतरुचिकौमुदीअतिघोरंदरति
मिरंहरति ॥ हेराधे तुंकाहि एकजरी बोलसी तेव्हां त्यायोगें
दंत दीप्ति लक्षण चंद्रिका अत्यंत भयंकर भयांधकारातें हरीतें
॥ तववदनचंद्रमालोचनचकोरं स्फुरदधरसीधवेरोच
यति ॥ तुझा मुखचंद्र जोतो माझ्या नेत्रचकोरातें स्फुरद्रूप तु
झें अधर लक्षण अमृत जें त्यासाठीं रुचीतें उत्पन्न करितो ह्म
णजे तूं बोलत असतां तुझें मुख चंद्राचेपरि भासतें तुझी दं
तदीप्ति चंद्र दीप्तिचेपरि तुझा अधर जोतो चंद्रगलत्सुधारूप-
होय त्यातें माझा नेत्र चकोर पाहायाकारणें इच्छितो ॥
॥ सत्यमिति ॥ हेसुदति यदिमयिसत्यमेवकोपिनीअ
सि ॥ हेसुंदरि जरी मजवर खरीच कोपयुक्त आहेस तरीं
॥ खरनखरशरघातं देहि ॥ तीक्ष्ण नखलक्षणशर जे तिं
हींकरून मारदे आणखी ॥ भुजबंधनंघटय ॥ आपुल्या





ऋजें करून आलिंगन लक्षण बंधन कर ( रदखंडनेंजनय )
दंतें करून ओष्ठ खंडन कर एवंच उभयतांस ( येनवासुख
जातंभवति ) जेणेंकरून सुख उत्पन्न होय तें त्वां करावें २
( त्वमसीति ) हेराधेत्वंममभूषणमसि ) तूं माझा अ
लंकार आहेस ( त्वंममजीवनमसि ) तूं माझा प्राण आहे
स ( त्वंमम भवजलधिरत्नमसि ) तूं मज संसारसमुद्रींचा
कंठमणिकोस्तुभ आहेस ( इहभवतीमयिसततमनु
रोधिनीभवतु तत्रममहृदयमतियत्नंवर्त्तते ) येथें मा
झे ठाईं निरंतर अनुकूल असावीस ( तत्र ) त्याविषयीं मा
झें हृदय अत्यंत यत्नयुक्त वर्त्ततें ह्मणजे तूं इया अनुकूलतेसा
ठीं जी आज्ञाहोईल तीतें आचरतों हा अभिप्राय ३
( नीलेति ) हेतन्विनीलनलिनाभमपिनवलोचनंकोक
नदरूपंधारयति ) नीलोत्पलासमान असूनही तुझें लो
चन कोकनद ह्मणजे आरक्त कमलजें त्याच्यारूपातें धरितें-
ह्मणजे कज्जलादिकेंकरून सर्वदा कृष्णवर्ण तुझें नेत्रकमल
क्रोधें करून आरक्त वर्णातें धरितें हें रौद्ररसाचें कार्य यासमयीं
अनुचित जरिनेत्रांतें कमलरूपत्वें रंगवावें ऐसें इच्छिलेंच तर्हि
रक्तकमलरूप मदनबाणजो तद्रूपत्वें रंगवावें ऐसें बोलतो ( इ
दं कृष्णांकुसुमशरबाणभावेन यदिरंजयसि एतदनुरू

पं ) हें कृष्णावर्ण नेत्रकमल जें यानें याचे कृष्णत्व ननाशितां कोकनदरूप मदनबाण जो तद्रूपत्वें जरि रंगविशील तर्हि हें शृंगाररसाचें कार्य यास्तव अनुरूप ह्मणजे योग्य होय ह्मणजे क्रोधावलोकनातें त्यागून कटाक्षें प्रेमावलोकनातें आचरावें ते ह्यां नेत्रीं मदनबाण रूप कोकनदत्व सिद्ध होउन नीलोत्पलत्व न नासेल जरि मजसह वर्तमान मधुपान करिसील तर्हि नेत्ररक्तत्व उचित दोषकरून नेत्रांस तांबडेपणा हा अनुचित हा भाव अन्यटीकेत आहे ४ ( स्फुरत्विति ) कुचकुंभयोरुपरि मणिमंजरी स्फुरतु ) कुचकुंभावर रत्नहार शोभो ह्मणजे क्रोधें त्यागिलें जें हारादिक भूषण तें पुनरपि मी अर्पितों हा अभिप्राय ( तव हृदयदेशं रंजयतु ) तो हार तुझ्या हृदयदेशातें रंजवो ( तव घनजघनमंडले रशनापि रसतु ) तुझा निबिड कटिपुरोभाग जो त्याचे ठाईं रशना ह्मणजे मेखला जी तीहि ( रसतु ) शोभो ( मन्मथनिदेशं घोषयतु ) ती मेखला किंकिणीच्या योगें कामाज्ञेप्रति घोषयुक्त करो ५ ( स्थलेति ) हे घनमसृणवाणि स्थलकमलगंजनं ) हे अतिकोमल वचन राधे स्थलकमळातें तिरस्कारितें ऐसें ( मम हृदयरंजनं ) माझ्या हृदयातें रंजवितें ऐसें ( तव चरणद्वयं ) तुझें चरणयुगुल जें त्यातें ( सरसलसद

लक्तकरागंकरवाणि ) सांद्रशोभायमान अलित्याचा ला लरंग ज्याचे ठाई ऐशातें मीकरीन ह्मणजे तुझ्या चरणातें हृद यासारिसें धरून अलक्तरंगेरंगउं काय तें चरणद्वय कसेप्रकार चें ( जनितरतिरंगपरभागं ) उत्पन्न केली आहे रतिरं गाचे ठाई परभाग ह्मणजे परस्पर शोभा ज्याणें ऐसें ह्मणजे - मी अलक्तक रंगेंकरून सद्यः यातें शोभविलें जरी नाहिं क्रौं च बंधादिकाचे ठायीं हें मला शोभवील क्रौंचबंध कामशास्त्रां त शोधावा ६ ( स्मरेति ) स्मरगरलखंडनं ) माझें सर्वांगीं वर्तलें मदन सर्पाचें विषजें त्यातें खंडन करितो आणी क उदार ह्मणजे मनोहर ऐशा तुझ्या पदपल्लवातें ( ममशिर सिमंडनंदेहि ) माझे मस्तकीं अलंकार रूपेंठेव ( मयिदा रुणोमदनकदनानलोज्वलति ) माझे ठाई दारुण मदन परितापरूप अग्निपेटतो ( तदुपहितविकारं ) तन्निर्मित स र्वांगीं विकारातें शिरस्थित तुझा पदपल्लव ( हरतु ) हरो ७ (इतीति ) मुरवैरिणः ) श्रीकृष्ण जो त्याचें ( इति ) याप्र- कारें ( राधिकामधि ) राधिकेचे ठाई प्रवर्तलें चटुल ह्मणजे मनोहर चाटु ह्मणजे प्रेमयुक्त पटु ह्मणजे चातुर्ययुक्त चारु ह्म णजे कोमल ( वचनजातं ) वाक्यसमूह ( जयति ) सर्वोत्कर्षे वर्तते तें वचन जात कसेप्रकारचें ( जयदेवकविभारतीभू

षितं ) जयदेवाची वाणी शोभली जेणें याप्रकारचें पुनः कसे प्रकारचें ( मानिनीजनजनितशातं ) अभिमानयुक्त- स्त्रीजनजो त्यास उत्पन्न केलें सुरवजेणें ॥ श्लोक परिहृतकृतातंकेशंकांत्वयासततंघनस्तनजघनयाक्रांते स्वांतेपरानवकाशिनि विशतिवितनोरन्योधन्योन कोपिममांतरंस्तनभरपरीरंभारंभेविधेहिविधेयतां १ ( हेकृतातंकेशंकांपरिहर ) केला आहे आतंक ह्मणजे क्रोधजीणे याप्रकारचे हेराधे ( शंकां ) अन्यस्त्री समागम विषयक शंकाजी तीतें त्याग ( घनस्तनजघनयात्वया अतिक्रांतेस्वांते ) जघन ह्मणजे कठिनस्तन आणखी जघन जीचें ऐशी तां आक्रमिलें ह्मणजे व्यापिलें अतएव ( परानवकाशिनि ) इतरांस अनवकाश ज्याचेठाई ऐसेंमाझेंहृदय वर्त्तलें असतां ( ममांतरंवितनोरन्योधन्यःकोपि नविशति ) माझ्या अंतःकरणाप्रति मदनावाचून अन्य पुण्यवंतहि होत्साता कोणि एक प्रवेश नकरि ह्मणजे माझेहृदयींतूं येक संचरली आहेस किंवा तुझ्यायोगें अनंगसंचरतो त्यावाचून इतर कोणीएक स्त्री वर्तेना यास्तव ( स्तनभरपरिरंभेविधेयतांविधेहि ) स्तनगोलकाच्या आलिंगन व्यापाराविषयीं कर्तव्यताजीति करमला आलिंगन देहा अभि

प्रांय १ श्लोक मुग्धेविधेहिमयिनिर्दयदं तदंशं दोर्वल्लिबंधनिबिडस्तनपीडनानि चंडित्व मेवमुदमंचयपंचबाणचंडालकांडदलनादसवःप्र यांति २ हेसुंदरिराधे ९ मयिनिर्दयदंतदंशांविधेहि माझेठाई निष्ठुर दंतघातातें आचर ९ दोर्वल्लिबंधनिबिडस्त नपीडनानिविधेहि ७ बाहुलताबंधनेकरून घनदाट जसें-होय तैसे स्तनपीडनेंजीं त्याते कर ९ हेचंडि ७ अत्यंत कोपयुक्ते राधे ७ त्वमेवमुदमंचय ७ तुंच यामदन युद्धें संतोषाते उत्पन्न कर अन्यथा ७ पंचबाणचंडालकांडदलनादसवःप्रयां ति ७ मदनलक्षण चंडाल बाणाच्या विदारणें करून प्राणजात आहेत २ श्लोक शशिमुखितवभा ति भंगुरुभ्रूर्युवजनमोहकरालकालसर्पः यदुदि तभयभंजनाययूनांत्वदधरसरसीधुसुधैवसिद्ध मंत्रः ३ टी० ९ शशिमुखि ९ हेचंद्रवदने ९ नवभंगुरभ्रू र्युवजनमोहकरालसर्पोभाति ७ तुझीवक्र भ्रूलताजीं तद्रूप तरूण जनास भ्रम करणार भयंकर कृष्णसर्प भासतो-ह्मणजे सर्पदंशें जसातुझ्याभ्रूलतेच्या दर्शनें तरुण पुरुष घुम तो ९ यूनांयदुदितभयभंजनाय ७ तरुणपुरुषांसजशा भ्रूलक्षणसर्पापासून उत्पन्न भयाच्या नाशाकाकारणें ७ त्वद

धरसीधुसुधैव सिद्धमंत्रः ) तुझी अधररूप सुधाजी तीच सिद्धमंत्र ह्मणजे मुख्य उपाय होय ३

श्लोक व्यथयति वृथा मौनं तन्वि प्रपंचय पंचमं तरुणि मधुरालापैस्तापं विनोदय दृष्टिभिः सुमुखि विमुखीभावं तावद्विमुंच न वंचय स्वयमतिशयस्निग्धो मुग्धे प्रियोहमुपस्थितः ४ हे तन्वि ) कृशांगि राधे ( तव वृथा मौनं व्यथयति ) तझें अकारण मौन मातें पीडितें यास्तव ( मधुरालापैः पंचमं प्रपंचय ) मधुरभाषणेकरून पंचमरागातें विस्तृत कर हे तरुणि ( दृष्टिभिस्तापं विनोदय ) दृष्टीकरून मनोदाहातें दूर कर हे सुमुखि ) तावत् विमुखीभावं विमुंच ) पाठमोरी बसून को ( हे मुग्धे अतिशयस्निग्धः प्रियोहं स्वयमुपस्थितोऽस्मि ) हे मुग्धे अतिशयें स्नेहाळ तुझा प्रियमीन बोलावितां आलों आहें यास्तव ( न वंचय ) मातें न अपमानावें ४

श्लोक बंधूकद्युतिबांधवोयमधरः – स्निग्धो मधूकच्छविर्गंडश्चंडि चकास्ति नीलनलिनश्रीमोचनं लोचनं नासाभ्येति तिलप्रसूनपदवीं कुंभाभदंति प्रिये प्रायस्त्वन्मुखसेवया विजयते विश्वं सपुष्पायुधः ५ टी० ( हे चंडि ) कोपनशीले राधे ( तवा





यमधरः बंधूकद्युतिबांधवश्चकास्ति ७ तुझा ओष्ठजो तो बंधूक पुष्पाचे कांतीचा मित्र ऐसा ह्मणजे बंधूक पुष्पसमान ताम्रवर्ण होत्साता शोभतो ८ तथालोचनंनीलनलिनश्रीमोचनंचकास्ति ७ तुझेंनेत्रनीलोत्पलाचे शोभेनेंत्यागिलें ऐसें होत्सातें शोभतें ८ तवनासातिलप्रसूनपदवीं अभ्येति ७ तुझीनासिका तिलपुष्प पदवीनेंपावते ह्मणजेतिलपुष्पाचे परि शोभतें ८ हेकुंदाभदंति ७ कुंदपुष्प समान दंतजीचे ऐसे हेप्रिये ८ प्रायःसपुष्पायुधः त्वन्मुखसेवयाविश्वंविजयते ७ बहुप्रकारे करून तोपुष्पायुध ह्मणजे मदन तुझ्यामुखाचे उपासनेनें विश्वातें जिंकितो ऐसें मी मानितों ह्मणजे तुझे अधरादिक पंचपुष्पातें पाहून विश्व मोहतें ते ह्मा त्याच पंचबाणातें पावून तुझ्या मुखाश्रये मदन विश्वातें जिंकितोकाय ५ श्लोक दृशौनवमदालसेवदनमिंदुमत्यान्वितंगतिर्जनमनोरमाविधुतरंभमूरुद्वयम् रतिस्तवकलावतीरुचिरचित्रलेखेभ्रुवावहोविविधयौवनंवहसिनन्विपृथ्वीगता ६ टी० ८ हेतन्वि ८ हेकृशांगिराधे ८ तवदृशौमदालसे ७ तुझ्या दृष्टीज्या त्यामदेंकरून अलसहोत ह्मणजे मातें पाहण्याकारणे मंद आहेत ८ वदनमिंदुमत्यान्वितं ७ तुझेंमु

रवचंद्रबुद्धिनें युक्त ह्मणजे माझे बुद्धीतें चंद्ररूपभासतें (गतिर्जनमनोरमा) तुझी गती जनाच्या मनातें रमविते (ऊरुद्वयंविधुतरंभं) तुझें ऊरुद्वयजेतें जिंकिल्या रंभा ह्मणजे कदलीज्याणे ऐसे ह्मणजे कदलीसमान (तवरतिः कलावती) तुझी रतिजीती अनेक कामशास्त्रोक्त कलाविशिष्ट होय (भ्रुवोरुचिरचित्रलेखे) तुझ्या भ्रूलता सुंदरचित्रीच्या रेखाच (पृथ्वीगतात्वंविविधयौवनं वहसि) पृथ्वीचे ठाईं वर्तली ऐशी तुं विचित्र तारुण्यातें वाहतेस (अहो) आश्चर्य याचाद्वितीयार्थ विविध ह्मणजे अनेक ऐसा यौवन ह्मणजे युवतीचा समूह जो त्यातें वाहतेस मदालसादिक अनेक स्त्रियांचे ठाईं जे चातुर्यसौंदर्यादिक गुण ते तुझे ठाईं वर्तताहेत पूर्वी मदालसा एक तुझे आगीं दोनही पृथ्वी मदालसा होत एवंच मदालसा इंदुमति मनोरमा रंभा कलावती चित्रलेखा ऐशा स्वर्गादिकांचे ठाईं विद्यमानस्त्रिया ज्या त्यांतें पृथ्वीगत एकाकिनि तुं वाहतेस हें आश्चर्य पृथ्वी शब्दें याछंदाचे नावही पृथ्वी ऐसें सूचविलें ६

येथें (प्रीतिंवस्तनुतां) हाश्लोक जयदेव कवीचा नव्हे

श्लोक॥ प्रीतिंवस्तनुतांहरिःकुवलयापीडेनसंभेदवान्राधापीनपयोधरस्मरणकृत्कुंभेनसार्धंरणे ॥



यत्रस्विद्यतिमीलतिक्षणमितिक्षिप्रंतदालोकनाद्व्या
मोहेनजितंजितंजितमभूत्कंसस्यकोलाहलः ॥ ७
टी०— राधापीनपयोधरस्मरणकृत्कुंभकुवलयापी
डेनसार्धंरणेसंभेदवान्सः हरिः जगतांप्रीतिं तनुतां ।
राधेचे अति स्थूल कुच जे त्याचें स्मरण करविणारे मस्तकींचे कुं
भज्याचे जसाचंद्र पाहतांचंद्रवत् मुखाचें स्मरण होतें तसेंच
त्या गजाचे कुंभस्थळ पाहतां राधिका कुचाचें स्मरणजालें हा-
अर्थ असो ऐसाराधापीनपयोधरस्मृतिकरणारा कुंभज्याचा ऐ
सा कुवलयापीड नाम कहस्ती त्याबराबर रणांत प्राप्तजालातो
हरि जगतां सप्रीतिउत्पन्न करो । यत्रहरौस्विद्यति चक्ष
षीमीलतिसति चकंसस्य तदालोकनात् व्यामोहेनक्षि
प्रंजितंजितमितिकंसस्यकोलाहलःभवतिस्म ।जो
हरी सात्त्विकोद्रेकें करून घाम पावला असतां आणीकडो झां-
कित असतां तदालोकनात्क्षणजे घाम पावणारा डोळे झांकणा
रा तशाकृष्णाचे अवलोकनेंकरून हाभीतो ह्मणून वेगेंकरून
जिंकलें जिंकलें याप्रकारचा कंसाचा कोलाहलजाला ७
इतिश्रीगीतगोविंदेप्राकृतटीकायांमानिनीवर्णने चतुरचतुर्भुजोना
मदशमः सर्गः १
श्लोक ॥ ॥ क्वचिरमनुनयेनप्रीणयित्वामृग-

क्षीं गतवति कृतवेषे केशवे कुंजशय्यां रचितरुचिरभूषां दृष्टिमोषेप्रदोषे स्फुरति निरवसादां कापिराधां जगाद १ टी॰ कृतवेषेकेशवेमृगाक्षींरुचिरं अनुनयेनप्रीणयित्वा कुंजशय्यांगतवति ( रचली आहे वेषह्मणजे अलंकार रचना राधेकारणे जेणें ऐसा केशव राधेतें बहुवेळ समाधान वचनें संतोषउन लतागृह शयनी गेला असतां ( दृष्टिमोषेप्रदोषेस्फुरति ) अंधकाराच्या योगें दृष्टीतें चोरितो ऐसा प्रदोष काळ स्फुरत असतां कापि कोणि एक सखी ( रचितरुचिरभूषांनिरवसादांराधांजगाद रचिली सुंदर कृष्णातें अलंकार रचनाजीणें ऐशी आणखी खेद रहित राधाजीतीप्रति बोलतीजाली १

## वसंतरागेरूपकताले अष्ट॰

यानंतर राधेप्रति सखीचेंभाषण

विरचितचाटुवचनरचनंचरणरचितप्रणिपातं
संप्रतिमंजुलवंजुलसीमनिकेलिशयनमनुयातं
मुग्धेमधुमथनमनुगतमनुसरराधिके ध्रु॰ १
घनजघनस्तनभारभरेदरमंथरचरणविहारं॥
मुखरितमणिमंजीरमुपैहिविधेहिमरालविकारं मुग्धे॰ २ शृणुरमणीयतरंतरुणीजनमोहन

मधुरिपुरावं कुसुमशरासनशासनबंदिनि पिक-
निकरेभजभावं मुग्धे० ३ अनिलतरलकिसल
यनिकरेणकरेणलतानिकुरंबं प्रेरणमिवकरभो
रुकरोतिगतिंप्रतिमुंचविलंबं मुग्धे० ४ स्फुरित
मनंगतरंगवशादिवसूचितहरिपरिरंभं पृच्छ
मनोहरहारविमलजलधारममुंकुचकुंभं मुग्धे०
५ अधिगतमखिलसखीभिरिदंतववपुरपिरति
रणसज्जं चंडिरणितरशनारवडिंडिममभिस
रसरसमलज्जं मुग्धे० ६ स्मरशरसुभगनखे
नसखीमवलंब्यकरेणसलीलं चलवलयक्व
णितैरवबोधयहरिमपिनिजगतिशीलं मुग्धे०
७ श्रीजयदेवभणितमधरीकृतहारमुदासि
तवामं हरिविनिहितमनसामधितिष्ठतुकंठ
तटीमविरामं मुग्धे० ८

टी० - (विरचितेति) मुग्धेराधिकेअनुगतंमधु
मथनमनुसर) हेमूढे राधिके अनुसरला ऐसा मधुसूदनजो
त्यावें तूं अनुसर तो मधुसूदन कसेप्रकारचा ( विरचितचा
टुवचनरचनं) रचिलीप्रेमवचनाची रचनाजेणें ( चरण
रचितप्रणिपातं चरणावर रचिलानमस्कारजेणें ऐसा ( सं

प्रतिमंजुलवंजुलसीमनिकेलिशयनमनुयातं ) यास
मयी सुंदर वेतसकुंजगृहीं क्रीडाशयनाप्रति गेला असे प्रका
रचा १ (घनजघनेति) घन ह्मणजे पुष्टजघन आणखी स्त
नजे त्याचा भाराचा अतिशय जीचेठाईं याप्रकारचें हे राधे कां
हीसें मंद मंद चरणाच्या विन्यासें रत्नखचित नूपुरातें वाजवी
त (उपैहि) हरिसमीपजा (मरालविकारंविधेहि) राज
हंसरीतीतें आचर ह्मणजे राजहंसापरि मंद मंद चाल २
(श्रृणिवति) रमणीयतरंतरुणीजनमोहनमधुरिपु
रावंश्रृणु) अत्यंत रम्य तरुणीजनास मोहक ऐसा मधुसूदना
चा शब्दजो त्यातें श्रवण कर (पिकनिकरेकुसुमशरास
नशासनबंदिनि भावंभज) कोकिलांचा समूह मदनाज्ञे
चा स्तव करणारा असतां ह्मणजे स्वगायनें मदनातें जागवीत
असतां श्रीहरीचेठाईं अनुरागातें स्वीकार ३ (अनिलेति
(हेकरभोरुलतानिकुरंबं अनिलतरलकिसलयनि
करेणकरेणप्रेरणंकरोति) हे सुंदरि हा वल्लींचा समूह जो तो
वायूनें चंचल पल्लवसमूहरूप हस्तें करून तुतें प्रेरणा करितो
चकाय ह्मणजे अचेतन वल्ली ही तुतें प्रेरिताहेत (गतिंप्रतिवि
लंबंमुंच) याकरितां तूं गमनास विलंबन को करूं ५
(स्फुरितमिति) हे राधे मदनवशास्तवच काय (स्फुरितं)





कांपतो ऐसा अतएव त्याशकुनें करून सूचविला हरीचा परि
रंभ ह्मणजे आलिंगन जेणे ऐसा ( **कुचकुंभं** ) हा कुचकुंभ जो
त्या प्रति ( **पृच्छ** ) आंगीं मदनविकार आहे किंनाहीं हें पूस तो
कुचकुंभ कसे प्रकारचा ( **मनोहरहारविमलजलधारं**
सुंदर मुक्तावली जी तीच निर्मल जल धारा ज्याचेठायीं ५
(**अधिगतेति** ) **हेचंडि** ) अतिकोपनें राधे ( **अखिलस**
**खीभिरपित्तवेदंवपुःरतिरणसज्जंअधिगतं** ) सकल स
खिज्या त्यांहीहि तुझें हें वपु जे तें सुरतरणास सिद्ध ऐसें जाण
लें ( **रणितरशनारवडिंडिमसरसमलज्जमभिसर** )
शब्दायमान मेखला तोच डिंडिम ह्मणजे रणवाद्य ज्या रति यु
द्धीं ऐसें सरस निर्लज्जत्वें कृष्णातें अनुसर ६ ( **स्मर**
**शरेति** ) **स्मरशरसुभगनखेनकरेणसखीमवलंब्यस**
**लीलंचल** ) मदनबाणवत् सुंदर नखे ज्याचीं ऐशा हस्तानें
सखी तें आश्रयून लीलायुक्त चाल तेथें जाऊन ( **वलयक**
**णितैः हरिमवबोधय** ) कंकण शब्दें करून हरीतें मी आलें अ...
**सचिव** नोहरी कसे प्रकारचा ( **निजगतिशीलं** ) निज ह्मण
जे आपण राधाजी तीचे गतीचे ठाईं शील ह्मणजे एकाग्रता-
जाची ह्मणजे तुझा आगमनाचे ध्यान ज्यास असे प्रकारचा ७
( **श्रीजयदेवेति** श्रीजयदेवानें गायिलें ऐसें हें गीत जे तें कृष्णा

चेठाई स्थापिलें मनज्यांहीं त्याभक्ता चे कंठलाटी प्रति सर्वदा अ
सो तें गीत कसे प्रकारचें (अधरीकृतहारं) नीच केला आ
हे हारज्याणें ह्मणजे कंठी हाराहून अधिक शोभतें ऐसें आ
णखी (उदासितवामं) स्वगुणेकरून निरस्कृत केल्या सुंद
री स्त्रिया जेणे ऐशा जरी हा रासस्त्रियाचे कंठी राहून शोभा
प्रद त्वयेतें तथापि सें विषयि लोकासच परंतु शुद्धांतःकरण
मुमुक्षुस नाही त्यांत ही तरुणस्त्रियांच्या कंठी तारुण्यात सर्व
दानाही हेंगीततर स्त्रीपुरुषांच्या कंठासारखें सर्वदा शोभ-
वितें ह्यायाचा उत्कर्ष ८

पुनरपिसखीराधेप्रति बोलते

श्लो० ॥ ॥ सामांद्रक्ष्यतिवक्ष्यतिप्रियकथांप्रत्यं
गमालिंगनैःप्रीतिंयास्यतिरंस्यतेसखिसमागम्येति
च्चिंताकुलः॥सत्वांपश्यतिकंपतेपुलकयत्यानंदतिस्वि
द्यतिप्रत्युद्गच्छतिमूर्छतिस्थिरतमःपुंजेनिकुंजेप्रियः
१ टी० — (सासमागम्यमांद्रक्ष्यति) तीराधा
येऊन मातें पाहाणार पाहून (प्रियकथांवक्ष्यति) मनोह
र कथेतें बोलणार बोलून (प्रत्यंगमालिंगनैःप्रीतिंयास्यति
प्रतिअवयवीं आलिंगनें जीं तिहीं करून संतोषातें पावणार
संतोषून (रंस्यते) रमणार (इतिचिंताकुलःसःप्रियः)





ऐसें चिंतनें व्याप्त होत्साता तो तुझा भर्ता श्रीकृष्ण जोतो ( हे स
खि ) राधे ( स्थिरतमःपुंजे निकुंजे ) स्थिर आहे अंधकार स
मूह ज्याचे ठाईं ऐशा लतागृहामध्यें ( त्वां पश्यति ) चिंतेच्या यो
गें मनाचे ठाईं तूतें पाहतो ( कंपते ) कांपतो ( पुलकयति ) रोमां
चानें आचरतो ( आनंदति ) ध्यानीं स्मरतक्रीडा कल्पून आनं
दातें पावतो २ स्विद्यति ) स्मरतश्रमें करून स्वेदयुक्त होतो ( प्र
त्युद्गच्छति ) तुं जाते ऐसें पाहून प्रत्युत्थान करितो ( मू-
र्छति ) ध्यानविच्छेदें तूतें न पाहतां मूर्छित होतो १

श्लो० ॥ ॥ अक्ष्णोर्निक्षिपदंजनं श्रवणयोस्तापि
च्छगुच्छावलिं मूर्ध्नि श्यामसरोजदाम कुचयोः कस्तूरिका
पत्रकं धूर्तानामभिसारसत्वरहृदां विष्वक् निकुंजे सखि
ध्वांतं नीलनिचोलचारु सुदृशां प्रत्यंगमालिंगति २

टी०- ( हे सखि ) राधे ( इदं ध्वांतं निकुंजे विष्वक् अभि
सारसत्वरहृदां धूर्तानां सुदृशां प्रत्यंगमालिंगति ) इदं-
ध्वांतं ह्मणजे हा अंधकार निकुंज स्थलाचे ठाईं आसमंतात्
फिरायासाठीं त्वरायुक्त हृदय ज्यांचें ऐशा धूर्त ह्मणजे परवंचक
स्त्रिया ज्या त्यांस प्रति अवयवाचे ठाईं आलिंगितो तो अनुकूल
याप्रकारें ( अक्ष्णोः अंजनं निक्षिपत् ) नेत्राचे ठाईं ध्वांत जें
तें काजळातें लाविनें ह्मणजे नेत्रीं कज्जलाचे परि भासतें ( श्रव

र्णयोस्तापिछगुच्छावलीनिक्षिपत् ) श्रवणाचेठाईं तमाल पत्रांचे कर्णपूर रचिते ( मूर्ध्निश्यामसरोजदामनिक्षिपत् ) मस्तकीं नीलोत्सल मालेतें गुंफिते ( कुचयोःकस्तूरिकापत्रकं ) स्तनाचेठाई कस्तूरिनें पत्रावळीतें रेखिते तेथ्वांत कसेप्र-कारचें ( नीलनिचोलचारु ) हृदयीं नीलकंचुकिचे परि सुंदर ऐसें २ श्लोक ॥ काश्मीरगौरवपुषामभि-सारिकाणामाबद्धरेखमभितोमणिमंजरीभिः एत त्तमालदलनीलतमंतमिस्रंतत्प्रेमहेमनिकषोपल-तांतनोति ३ ( तमालदलनीलतमंएतत्तमिस्रं ) तमालपत्राचेपरि अतिशयें नीलवर्ण हेंतमिस्र ह्मणजे तम जेंतें काश्मीर ह्मणजेकेशरजेंतद्वत् पीलवर्णवपुज्यांचे ऐशा अभिसारिकास्त्रियाज्या त्याच्यामणिमंजरीह्मणजे मणिकिरणजे तिहीं करून आसमंतात् आबद्ध ह्मणजे रचिल्यारेखा ज्यातमाचेठाई ऐसें होत्सातें ( तत्प्रेमहेमनिकषोपलतांतनोति ) त्याचे प्रेमपरीक्षेविषयीं सुवर्ण घर्षणपाषाणत्वातें आचरतें ह्मणजे पतीतें इछून लोकांते नकळतां संकेतस्थळींजाते जीस्त्रीती अभिसारिकाह्मणावी त्याअभिसारिका स्त्रियांचें पतीचे ठाईं प्रेमजें त्याचीपरीक्षा अंधकारी निःशंकगमनावरून कळतें जसीसुवर्णपरिक्षा कसोटीच्यादगडावर निशां

क यर्वणन्वरून कळतें तद्वत् तस्मात् हा अंधकार स्त्रीप्रेम परिक्षे
चा निकषपाषाणहोय तेथें सुवर्ण रेखास्थानी मणिमंजरी
होत सुवर्ण पट्टिकेचेस्थानीं अभिसारिकावर्णिल्या ३

श्लोक ॥ हारावलीतरलकांचनकांचिदामकेयू
रकंकणमणिद्युतिदीपितस्य॥ द्वारेनिकुंजनिलयस्य
हरिंनिरीक्ष्यव्रीडावतीमथसखीनिजगादराधां ४

१ अथनिकुंजनिलयस्यद्वारेस्थितांहरिंनिरीक्ष्य व्रीडा
वतींराधांसखीनिजगाद १ यानंतर निकुंजगृहाचेद्वारीं
जाऊन राहिली होतीती हरीतें पाहून लज्जावती ह्मणजे स
कृत निष्ठुर भाषणातें स्मरून लज्जेतें पावली राधा जी तीप्रति
सखी बोलतीजाली तेंनिकुंजगृह कसेप्रकारचें हारावलीत
रल ह्मणजे हारस्थ राधेचें हरीचेंही हारस्थ मुख्यमणीजे त्या
चेदीप्तीनें आणखी स्वर्णमेखला दावकेयूर कंकणें याचेदीप्तीनें
२ दीपितस्य १ प्रकाशित असेप्रकारचें ४ राधेप्रती सखी
बोलते वराडीरागेअडवताले अष्ट॰

मंजुतरकुंजतलकेलिसदने प्रविशराधेमाधव
समीपमिहविलसरतिरभसहसितवदने १
नवभवदशोकदलशयनसारे प्रविशराधेमा
धवसमीपमिहविलसकुचकलशतरलहारे

२ कुसुमचयरचितशुचिवासगेहे प्रविश राधेमाधवसमीपमिह विलसकुसुमसुकुमारदेहे ३ जलमलयजपवनसुरभिशीते प्रविश राधेमाधवसमीपमिह विलसरसवलितललितगीते ४ विततबहुवल्लिनवपल्लवघने प्रविश राधेमाधवसमीपमिह विलसचिरमिलितपीनजघने ५ मधुमदितमधुपकुलकलितरावे प्रविशराधेमाधवसमीपमिह विलसमदनरभसरससभावे ६ मधुतरलपिकनिकरनिनदमुखरे प्रविशराधेमाधवसमीपमिह विलसदशनरुचिरुचिरशिखरे ७ विहितपद्मावतीसुखसमाजे कुरुमुरारेमंगलशतानीह भणितजयदेवकविराजराजे ८ (इति

टी० १ हेराधेमंजुतरकुंजतलकेलिसदने इह माधवसमीपंप्रविश । अतिसुंदर कुंज तळरूप क्रीडा गृहजे या चे ठायीं माधवाचे समीप प्रवेशनकर स्मरत हर्ष स्त्व मंद हास्य युक्त वदनजीचें याप्रकारचे राधे १ विलस । विलास कर

१ नवभवेति । कुचकलशांवर चंचलहार जीचे याप्रकारचे हेराधे नूतनवर्तलीत अशोकपत्रेंजीं त्या मंचकेकरून

श्रेष्ठ ऐसें हे कुंज गृह जें त्याच्या ठायीं प्रवेश कर आणखी वि
लास कर २ ( कुसुमेति ) कुसुमवत् सुकुमार देह जीचा
याप्रकार चे हे राधे कुसुम समुदायें करून रचिलें सुंदर वास
स्थान ज्याचे ठाई ऐशा कुंज गृहीं प्रवेश इह विलस ३
( जलेति रसयुक्त अत एव ललित ह्मणजे सुंदर गीत जी
चे याप्रकारचेच राधे जल कण युक्त मलयागिरि चं
दन वायू जो तेणें करून सुगंध शीतल ऐसा हा कुंज जो येथें
प्रवेश आणि विलस ४ ( वितनेति ) चिर कालें करून
मिलित ह्मणजे संबद्ध आणखी कटि पुरोभाग जीचा याप्र
कारचे राधे विस्तार युक्त पुष्कल वल्ली ज्याच्या नव पल्लवें करू
न घनदाट हें कुंज गृह येथें प्रवेश आणखी विलस ५
( मधिति ) मदनाच्या वेगें करून शृंगार रसयुक्त भाव ह्म
णजे अभिप्राय जीचा याप्रकारचे राधे मकरंदें करून हृष्ट ऐ
सी भ्रमरकुळें जीं त्याहीं केला ध्वनी ज्याचे ठायीं ऐशा या कुं
ज गृहामध्यें प्रविश आणि विलस ६ ( मधुतरेति )
दशन रुचि ह्मणजे दंताची दीप्ती जीच कोणि एक रुचिर शि
खर ह्मणजे सुंदर रत्न विशेष जीचे ठाईं ऐशे प्रकारचे राधे
वसंत दर्शनें करून चंचल कोकिलांचे समूह जे त्याच्या शब्दें ध
न्यायमान ऐशें हे कुंज गृह जे याचे ठायीं प्रवेश आणखी वि

लस ७ (विहितेति) हेमुरारेविहितपद्मावतीसुखसमाजे) हेहरेकेला आहे पद्मावती नामक स्त्रीजी ती चेठाई सुखसमूहजीणे ऐसा (भणति) तुझ्या गुणातें वर्णितो मीजयदेव नामक कविराज्यांचा राजाजो त्याच्याठाई (मंगलशतानिकुरु) कल्याण शतका तें कर पद्मावतीनामकजयदेवाची स्त्री हेंप्रसिद्ध ८

श्लो० ॥ ॥त्वांचित्तेनचिरंवहन्नयमतिश्रांतोभृशंतापितः कंदर्पेणचपातुमिच्छतिसुधासंबाधबिंबाधरं अस्यांकंतदलंकुरुक्षणमिहभ्रूक्षेपलक्ष्मीलवक्रीतेदासइवोपसेवितपदांभोजेकुतः संभ्रमः १

टी॰ हेराधे (अयंचित्तेनत्वांचिरंवहन् अतिश्रांतः) हाहरी तूतें चित्तेंकरून चिरकाळ वाहत होत्साता एखादा भार वाही जसा तसा अत्यंत श्रमला (कंदर्पेणचभृशंतापितः) मदनानेहि अत्यंत संतप्तकेला यास्तव (सुधासंबाबिंबाधरंपातुमिच्छति) अमृतें व्याप्त तुझा बिंबाधरजो त्यातें चुंबायाकारणें इछितो (तत् अस्यांकंक्षणमलंकुरु) त्याकारणास्तव याच्या उत्संगातें क्षणमात्र तूं शोभीव याचे मांडीवर बसली असतां शोभेल हाअर्थ त्यासमीप जायास मजासंभ्रमवाटतो ऐशीशंकाकरसील तर्हि एक (भ्रूक्षेपल-

क्ष्मीनवक्रीतेंदासेइवउपसेवितपदांभोजेइहसंभ्रमःकु
नः ) भ्रूक्षेपह्मणजे भ्रूलतायुक्तकटाक्षजोतोच कोणि एक
लक्ष्मी ह्मणजे धनजें तेणेकरून ( नवक्रीते ) नूतन विकत
घेतला अतएव दासाचे परि सेविलें चरणाकमलजेणे याप्र-
कारचा कृष्णजो याचे ठाईं संभ्रमकोठून १

श्लोक ॥ ॥ साससाध्वससानंदा गोविंदेलोललोच
ना॥ सिंजानामंजुमंजीरंप्रविवेशनिवेशनं २ टी.
( सामंजुमंजीरंसिंजानाससाध्वससानंदानिवेशनं
प्रविवेश ) तीराधा मंजुल नूपुरातें वाजवीत होत्साती रति
शास्त्राचे ठाईं महानिपुणजो त्यातें कसें रंजवावें हे चिंतेने सं
भ्रम युक्त रतिनिश्चयें आनंदयुक्त ऐशी रतिस्थानाप्रति प्रवे
श करितीजाली ती कसेप्रकारची गोविंदे लोललोचना गोविं
दावर चपल लोचनें जीची ऐसी २

यानंतर कविजोतो राधा हरीतें पाहतीजाली ऐसेंवर्णितो

वराडीरागेरूपकताले अष्ट०

राधा वदनविलोकनविकसितविविधविकारवि
भंगं जलनिधिमिवविधुमंडलदर्शनतरलिततुं
गतरंगं हरिमेकरसंचिरमभिलषितविलासं
साददर्शगुरुहर्षवशंवदवदनमनंगनिवासंध्रु०१

हारममलतरतारमुरसि दधतं परिरभ्य विदूरं स्फुटतरफेनकदंबकरंबित मिव यमुनाजलग तपूरं हरिमे० २ श्यामलमृदुलकलेवरमंडलम मधिगतगौरदुकूलं नीलनलिनमिव पीतपरा गपटलभरवलयितमूलं हरि० ३ तरलदृगंचल चलनमनोहर वदनजनितरतिरागं स्फुटकम लोदरखेलितखंजनयुगमिव शरदितडागं ह रि० ४ वदनकमलपरिशीलन मिलितमिहिरस मकुंडलशोभं स्मितरुचिरुचिरसमुल्लसिताध रपल्लवकृतरतिलोभं हरि० ५ शशिकिरणछु रितोदरजलधरसुंदरसकुसुमकेशं तिमिरो दितविधुमंडलनिर्मलमलयजतिलकनिवेशं ६ विपुलपुलकभरदंतुरितं रतिकेलिकलाभिरधी रं मणिगणकिरणसमूहसमुज्वलभूषणसुभ गशरीरं हरि० ७ श्रीजयदेवभणितविभवद्वि गुणीकृतभूषणभारं प्रणमत हृदि विनिधाय ह रिं सुचिरसुकृतोदयसारं हरि० ८

टी० —(राधेति) साहरिं ददर्श) ती राधा श्रीहरीतें पाहती जाली तो हरी कसे प्रकारचा (एकरसं) एके राधेचे ठाई रसज्ञ

णजे प्रीतीज्याची ऐसा पुनः कसेप्रकारचा ( चिरमभिलषि
तविलासं ) चिरकाळ इच्छिला विलास जेणें ऐसा पुनः क
सा ( गुरुहर्षवशंवदवदनं ) परमहर्षाधीन मुख ज्याचें पुनः
कसा ( अनंगनिवासं ) मदनाचे वासस्थान ऐसा पुनः तोक
सा चंद्रमंडळदर्शनें करून उच्चंबळ मोठे तरंग ज्याचे ठायीं
ऐसा जलनिधि ह्मणजे समुद्र जो तद्वत् राधेच्या दर्शनें विकसि
त आहेत नानाप्रकार विकार रचना ज्याचे ठाईं ऐसा १
हारमिति ) पुनः तो श्रीहरी कसेप्रकारचा स्पष्टतर फेनसमूह
जो तेणें करून मिश्र यमुनाजलपूर जो तद्वत् उरस्थलीं हारा
तें आलिंगून धरितो असेप्रकारचा तो हार कसा ( विदूर
ममलतरतारं ) अतिदीर्घ आणखी निर्मळतर स्वरूप ज्या
चें ह्मणजे यमुनाजलपूराचेपरि श्यामवर्ण हरी त्याचे ठाईं फे
नमाळा जसी तसा हार २ ( श्यामलेति ) पीतवर्ण परा
ग जो त्याच्या समुदायें वेष्टिलें मूळ ज्याचें ऐसे नीलोत्पल जें
तद्वत् परिधान केलें पीतांबर जेणें ऐसा आणखी श्यामवर्ण
सुंदर देहावयव ज्याचे ह्मणजे नीलोत्पलवत् हरी शोभतो
परागवत् पीतांबर होय ३ ( तरलेति ) पुनः तो कसा
विकसित कमळापरि उदरीं खेळतें खंजननामक पक्षिद्वय
ज्या तडागाचे ठायीं ऐसा शरत्काळीं तडाग जो तद्वत् चंचलक

कटाक्षांच्या चलनेकरून मनोहर वदनजें तेणेंकरून उत्पन्न केलि रतिचेठाई प्रीतिजेणें ऐसा ह्मणजे तडागवत् भगवान् कमलवत् वदन खंजनवत् नयनांचल ४ ( वदनेति ) पुनः तो कसा मुखकमलाच्या प्रकाशनार्थ दोहींकडून मिळालींत सूर्य समान कुंडलेंजीं तिहीं करून शोभतो ऐसा आणखी मंद हास्याचे दीप्तीनें सुंदर स्फुरद्रूप अधर पल्लव जो तेणेकरून निर्मिली राधेकारणें स्मरत कामना जेणें ऐसा ५ ( शशीति ) चंद्रकिरणें करून व्याप्त उदर ज्याचें ऐसा मेघ जो तद्वत् सुंदर पुष्प युक्त केश ज्यांचे ऐसा चंद्रस्थानी पुष्पें मेघस्थानीं केशवर्णिले आणखी अंधकारीं प्रकाशिलें चंद्रमंडलजें तद्वत् निर्मळ चंदन तिलक रचना ज्याचेठाई ऐसा ६ ( विपुलेति ) पुष्कल रोमांच भरें व्याप्त आणखी रतिक्रीडाकौशल्यें करून चपल ऐसा रत्नसमूह संबंधि किरणाच्या समुदायें करून देदीप्यमान भूषणेंजीं तिहीं करून सुंदर मूर्ति ज्याची ऐसा श्रीहरीजो त्यातें पाहती जाली ७ श्रीजयदेवेति ) श्रीजयदेवानें वर्णिलाहा रहस्य विभव-जो त्याचेठायीं द्विगुण केला आहे भूषण समूह ज्याणें ह्मणजे जयदेवाची वाचा सहजच उपमायमकाद्यलंकार विशिष्टलें करून भूषित त्यावर स्वगुणवर्णने करून अतिशयें अलंकृत



केली जे.णें ऐसा श्रीहरीजो त्यालें हृदयीं स्थापुन हे भक्त हो (प्रणमत) नमस्कार करा तो श्रीहरी कसे प्रकारचा (भवजलस्फ्फुलोदयसारं) संसार समुद्राचे ठाईं पुण्याचा उदय जो त्याचा सार ह्मणजे मुख्यफळरूप ऐसा ८

यानंतर राधेच्या सात्विक भावातें कवि वर्णितो

श्लोक ॥ ॥ अतिक्रम्यापांगंश्रवणपथपर्यंतगमन प्रयासेनेवाक्ष्णोस्तरलतरतारंपतितयोः इदानीं राधायाः प्रियतमसमालोकसमये पपातस्वेदांबु प्रसरइवहर्षाश्रुनिकरः ९ टी ( इदानींप्रियतमसमालोकसमये ) या श्रीकृष्ण दर्शनसमयीं ( राधायाअक्ष्णोःस्वेदांबुप्रसरइवहर्षाश्रुनिकरःपपात ) राधेच्या नेत्राचे ठाईं स्वेदजळ प्रवाहाचे परि आनंदबाष्पाचा पूर पडता जाला यावर उत्प्रेक्षा ( अपांगमतिक्रम्यश्रवणपथपर्यंतगमनप्रयासेनेव ) कृष्णावलोकना सार्थी अपांगातें अतिक्रमून कर्ण मार्ग पर्यंत गमन जें त्याच्या प्रयासेंच करून कायनेत्रीं स्वेदांबुपूर प्रवर्तला जसा मार्गस्थ पुरुषास गमनश्रमें स्वेद वाहतो तद्वत् अतएव नेत्र कसे प्रकारचे ( तरलतरतारंपतितयोः अतिचपल नेत्र कनीनिकाज्या पतना चे ठाईं याप्रकारें पतितयोः ह्मणजे कर्णपथाहुन स्वस्थानीं पडते जालेत असे प्रकार

चे त्यांबराबरच अश्रुपूरहि पडता जालाहा अभिप्राय १

श्लोक ॥ ॥ भजंत्यास्तल्पांतं कृतकपटकंडूतिपिहित स्मिते याते गेहाद्बहिरवहितालीपरिजने ॥ प्रियास्यंपश्यंत्याः स्मरशरवशाकूतसुभगं सलज्जायालज्जाव्यगमदिवदूरंमृगदृशः २ टी० ( अवहितालीपरिजने गेहाद्बहिर्याते सति सलज्जायाः प्रियास्यंपश्यंत्याःमृगदृशः लज्जापिदूरंव्यगमदिव ) सावधानसखी लक्ष्मण सेवकजनगृहांतून बाहेर गेला असतां लज्जायुक्त आणखी पतिमुखातें पाहते ऐसी शयनपर्यंत चालली राधाजी तीची लज्जाही सखीचेपरि दूर जाती जाली काय बाहेर जात असतां तोसखीजन कसेप्रकारचा ( कृतकपटकंडूतिपिहितस्मिते ) केलें कपटें करून कर्णादिकंडूयन जें तेणें करून आच्छादिलें मंद हास्य जेणें याप्रकारिचा ह्मणजे राधेचें चरित्र पाहून आलें गुप्त हास्य जें तें कर्णकंडूतिमिषें आच्छादूनसखीजन बाहेरनिघालाहा अभिप्राय तें कृष्णमुख कसें ( स्मरशरवशाकूतसुभगं ) मदन बाणाधीन हावभावादिक अभिप्राय जो तेणें सुंदर याप्रकारचें २ यानंतर कवि सर्गांतीं मंगलातें आचरतो ॥ श्लोक ॥ जयश्रीविन्यस्तैर्महितइवमंदारकुसुमैःस्वयंसिंदूरेणद्विपरणमुदामुद्रितइव ॥ भुजापीडक्रीडाहतकुवलयापीडकरिणःप्रकीर्णा



सृगबिंदुर्जयति भुजदंडो मुरजितः ॥१॥ टी० -( भुजपीड क्रीडाहतकुवलयापीडकरिणः मुरजितः प्रकीर्णासृगबिंदुर्भुजदंडो जयति ) भुजबंधलीलेचे करून मारिला कुवलयापीडनामक हस्ती जेणे एसा मुरारी जो त्याच्या आसमंतात् पडले गजाचे बिंदु ज्यावर ऐसा बाहुदंड जो तो सर्वोत्कर्षे वर्ततो रक्तबिंदु वर उत्प्रेक्षा करून बाहू ते वर्णितो ( जयश्रीविन्यस्तैर्मंदारकुसुमैः महितइव ) विजयलक्ष्मीनें समर्पिलीं कल्पद्रुम पुष्पें जीं तिहीं पूजिलाच काय ऐसा किंवा ( द्विपरणसमुदास्स्वयंसिंदूरेणमुद्रितइव ) सिंदूरचर्चित कुवलयापीड जो त्यासीं युद्धसंतोषें स्वयेंहि सिंदूरें करून चिह्नित काय ३ इतिगीतगोविंदे प्राकृतटीकायांसानंदगोविंदोनामैकादशः सर्गः ११ ७

श्लोक ॥ ॥ गतवतिसखीवृंदेमंदत्रपाभरनिर्भरस्मरशरवशाकूतस्फीतस्मितस्नपिताधरां ॥ सरसमनसंदृष्ट्वाराधांमुहुर्नवपल्लवप्रसरशयनेविक्षिप्ताक्षीमुवाचहरिःप्रियां १ टी० ( सखीवृंदेगतवति ) सखीसमूह बाहेर गेला असतां ( मंदत्रपाभरनिर्भरस्मरशरवशाकूतस्फीतस्मितस्नपिताधरां ) कांहीशा लज्जेच्या अतिशयें व्याप्त मदन बाण जो तदधीन हावरूप अभिप्राय

जो तेणें अभिहृद्ध मंदहास्यजें तेणें व्यापिले दोनही अधर जीचे ह्मणजे कामवशें लज्जायुक्त मंदहांसते ऐसी (नवपल्लवप्रसरशयने मुहुर्विक्षिप्ताक्षीं प्रियांराधांदृष्ट्वा) कोमल पल्लवास्तरणा रूपशय्याजितीचेठायीं पुनःपुनः स्थापिली दृष्टीजीणे ऐशी अतएव (सरसमनसं) सानुराग अंतःकरण जीचें ऐसी प्रियाराधाजी तीतें पाहून ( हरिरुवाच) श्रीहरी बोलता जाला १

श्रीहरीचें राधेप्रतिभाषण

विभासरागेएकतालीताले अष्ट०

किसलयशयनतलेकुरुकामिनिचरण नलिनविनिवेशं तवपदपल्लववैरिपराभवमिदमनुभवतुसुवेशम् १ क्षणमधुना नारायणमनुगतमनुसरमोराधिके ध्रु० १ करकमलेनकरोमिचरणमहमागमितासिविदूरं क्षणामुपकुरुशयनोपरिमामिवनूपुरमनुगतिसूरं क्षण० २ वदनसुधानिधिगलितममृतमिवरचयवचनमनुकूलं विरहमिवापनयामिपयोधररोधकमुरसिदुकूलं क्षण० ३ प्रियपरिरंभणरभसवलितमिवपुलकितमन्यदुरा

पं मदुरसिकुचकलशंविनिवेशयशोषयमन
सिजतापं क्षण० ४ अधरसुधारससुपनय
भामिनिजीवयमृतमिवदासं त्वयिविनिहि
तमनसंविरहानलदग्धवपुषमविलासं क्षण०
५ शशिमुखिमुखरयमणिरसनागुणमनु
गुणकंठनिदानं ममश्रुतियुगलेपिकरवविक
लेशमयचिरादवसादं क्षण० ६ मामतिवि
फलरुषाविफलीकृतमवलोकितुमधुनेदं मी
लतिलज्जितमिवनयनंतवविरमविसृजर-
तिखेदं क्षण० ७ श्रीजयदेवकवेरिदमनुपद
निगदितमधुरिपुमोदं जनयतुरसिकजनेषु
मनोरमरतिरसभावविनोदं क्षण० ८

टी० ( किसलयेति ) भोराधिके अधुनाक्षणमनु
गतंनारायणंमां अनुसर ) हेराधे यासमयीं क्षणमात्र
अनुकूलमी नारायण जोत्यामाते अनुसर कोणत्याप्रकारें तें
ऐक हेकामिनी ( किसलयशयनतलेचरणनलिनवि
निवेशंकुरु ) कोमल पल्लव शय्येवर चरणकमलस्थापना
तें आचर ( नवपदपल्लववैरिसुवेशमिदंपराभवम
नुभवतु ) तुझ्याचरण पल्लवास शत्रूरूप सुंदर ऐसेंहें शय

नजें तें अवमानातें पावो ह्मणजे कोमलत्वादिकें करून प
दपल्लवापेक्षां अधिक होउन वैरातें आचरलें त किसलयजें
त्या ऱ्याशिरीं पाद ठेवणें हें उचित १ (करकमलेति)
विदूरमागमितासि अहंकरकमलेन चरणं करोमि)
हे राधे दूर आलीस मी करकमलें करून चरणातें सेवितों ह्म
णजे चरण संवाहन करूं इच्छितों यास्तव (शयनोपरि अ
नुगतिश्रूरं मांक्षणमुपकुरु नूपुरमिव) शयनावर से
वेचे ठाईं श्रूर मी जो त्यामजवर क्षणमात्र उपकार कर जसा
चरण योगें नूपुरावर उपकार केला तद्वत् २ (वदनेति)
मुखचंद्रापासून निघालें अमृताचेपरि वचनजें त्यातें बोल
(पयोधररोधकमुरसि दुकूलं अपनयामि) स्तनासि
आच्छादक तुझी कांचोळीजी तितें सोडितों (विरहमिव)
स्तनालिंगन दूर करणार विरहजो त्याचे परि दूर केलें ३
प्रियेति) पुलकितं प्रियपरिरंभणरभसवलितमिव
कुचकलशं मदुरसि विनिवेशाय) रोमांचयुक्त पतिच्या
आलिंगनार्थ हर्षें करून पुढें सारिलाच काय ऐशा स्तनकल
शातें माझ्या वक्षस्थलावर स्थाप तेणें करून (मनसिजता
पं शोषय) हृदयगत कामदाहातें शोषावें पूर्णकुंभाचे स्पर्शें
दाहशमन होतें हें प्रसिद्ध हा स्मर कसे प्रकारचा (अन्यदुरा



पं ) इंद्रादिकांस दुर्लभ ऐसा ४ (अधरेति) हे भामिनि अधरसुधारसमुपनय दासं मांमृतमिव जीवय ) हे राधे अधरामृत रूप रसायनातें दे तेणेकरून दास मी जो त्यामातें मेल्या मनुष्यातें जसें तसें वांचीव मी कसे प्रकारचा तुझे ठायीं स्थापिलें मन जेणें ऐसा वियोगाग्नीनें संतप्त वपूजाचे अत एव (अविलासं) अचेतन असे प्रकारचा. ५ (शशिमुखेति) हे शशिमुखि अनुगुण कंठ निनादं मणिरसनागुणं मुखरय ) हे चंद्रवदने समान आहे कंठनिनाद जेणेसीं ह्मणजे तव कंठध्वनिवत् मंजुळ ऐसा रलरव चित मेखलाध्वनि जो त्यातें (पिकरवविकलेमम श्रुतियुगुले विरादवसादं शमय ) कोकिलशब्द श्रवणें दुःखित ऐसें माझे कर्णद्वय जें त्याचे ठाईं चिरकाळ तुझ्या वियोगें खेद जो त्यातें त्या ध्वनीनें शमिव ६ (मामतीति) हे राधे अतिविफलरुषा विकलीकृतमामधुना अवलोकितुं लज्जितमिव नवदं नयनं मीलति ) हे राधे अत्यंत व्यर्थ क्रोधें दुःखी केला त्यामातें या काळीं पहाया कारणें पश्चात्तापें लज्जायुक्तच काय ऐसे तुझें नयनकमल जें तें झांकतें तस्मात् (विरम) लज्जेवर विरक्त हो (रतिखेदं विसृज) क्रीडा दे त्यावें त्याग ७ (श्रीजयदेवेति) अनुपदगदित

मधुरिपुमोदं श्रीजयदेवकवेरिदं ॥ पदोपदीं गायि येला मधुरिपुचाहर्ष ज्याचेठाईं ऐसें श्रीजयदेवकविचेंहें गीत जें तें ॥ रसिकजनेषुमनोरमरतिरसभावविनोदंजनयतु ॥ रसिकपुरुषाचेठायीं सुंदर रतिरसभाव विनोदजो त्यातेंनि र्माणकरो रतिह्मणजेसंभोग रसह्मणे शृंगार भाव ह्मणजे स्वेदा दिक सात्विकभाव याचा विनोद ह्मणजे कौतुक ८

श्लोक ॥ ॥ प्रत्यूहः पुलकांकुरेणनिबिडाश्लेषेनिमेषेणच ॥ क्रीडाकूतविलोकितेधरसुधापानेकथाकेलिभिः आनंदाधिगमेनमन्मथकलायुद्धेपियस्मिन्नभूदुद्भूतः सतयोर्बभूवसुरतारंभः प्रियंभावुकः १

टी०- यस्मिन्सुरतारंभेनिबिडाश्लेषेविधेयेपुलकांकुरेणप्रत्यूहोभूत ॥ ज्यासुरतारंभकाळीं गाढ आलिंगन कर्तव्य असतां रोमांचोदयेंकरून व्यवधान रूप प्रत्यूह ह्मणजे विघ्न असतें जालें ॥ क्रीडाकूतविलोकितेनिमेषेणचप्रत्यूहः ज्यासुरतारंभाचे ठाईं क्रीडायुक्त अभिप्राय पूर्वकविलोकन कर्तव्य असतां निमेषें करून निर्विघ्नवर्ततें जालें ॥ अधरसुधापानेंकथाकेलिभिः ॥ अधरामृत पान कर्तव्य असतां भाषण विनोदें करून अंतराय असता जाला ॥ मन्मथकलायुद्धे आनंदाधिगमेन ॥ कामकलायुक्तसुरतसंग्राम कर्तव्य अस

नां आनंदप्राप्तीकरून अंतराय वर्त्तता जाला ( तयोःसस्फुर
नारंभ उद्भूतः ) तयोः ह्मणजे राधा आणखी कृष्ण यांचा
याप्रकारचा स्फुरतारंभ जो तो प्रकट होता जाला तो कसे प्रका
रचा ( प्रियंभावुकः ) प्रिय आसमंतात् वर्ततें हास्वभाव-
ज्याने ठायीं ( १ श्लोक ॥ ॥ दोर्भ्यांसंयमितः
पयोधरभरेणापीडितः पाणिजैराविद्धो दशनैःक्षता
धरपुटः श्रोणीतटेनाहतः हस्तेनावनमितःकचेधरम
धुस्यंदेनसंमोहितः कांतःकामपितृप्तिमाप तदहोका
मस्यवामागतिः १ टी० ( दोर्भ्यांसंयमितः )
कामयुद्धाचे ठाईं राधेनें बाहुबंधि बांधला ह्मणजे आलिंगिला
स्तन भारें पीडिला नखाहीं विदारिला दांतांहि क्षतयुक्त अ
धर पुट ज्याचा ऐसा केला कटिप्रदेशें पुनः पुनः हाणिला ह-
स्तानें केश बधीं धरून आवळिला ओष्ठामृतद्रवें मोहिला ऐ
सा हि होत्साता कांत ह्मणजे भर्ता श्रीकृष्ण जो तो ( कामपितृ
प्तिमाप ) या विपरीत स्फुरताचे ठाईं कोण एक तृप्ति जी ती तें पावला
अहो आश्चर्य हें ( कामस्यवामागतिः कामाची गती विप
रीत आहे ज्यास्तव उपद्रवें स्फुरवदेतो १
श्लो० ॥ ॥ मारांके रतिकेलिसंकुलरणारंभेत
यासाहसप्रायंकांतजयायकिंचिदुपरिप्रारंभियत्सं

भ्रमात् ॥ निष्पंदाजघनस्थलीशिथिलितादोर्वल्लि रुत्कंपितं वक्षोमीलितमक्षिपौरुषरसः स्त्रीणांकुतः सिद्ध्यति २ टी० ( तयाक्रांतजयायमारांकेरतिके लिसंकुलरणारंभेसंभ्रमात् उपरिसाहसंप्रार्थयत्किं चिदारंभितदानिष्पंदाजघनस्थली ) त्या राधेनें पती तें जिंकायासाठी मदन चिन्हरूप ऐसा सुरतक्रीडाव्यास काम युद्धाचा आरंभजो त्याचे ठायीं संभ्रम वशें श्रीकृष्णाउ परि अविवेक प्रायजें काहीं अनिर्वाच्य आरंभिलें तेव्हां ज घनस्थलींनिश्चलअसती जाली ( दोर्वल्लिःशिथिलिता ) बाहु वल्लीढिली जाली वक्षःउत्कंपितमभूत् ) वक्षस्थळ ध डाडिलें ( अक्षिमीलितं ) नेत्रकमल संकोचले तस्मात् ( स्त्रीणांपौरुषरसःकुतःसिद्ध्यति ) स्त्रियांची पराक्रमे छा कोठून सिद्ध होईल म्हणजे पराक्रमें पुरुषवत्सुरतातेंआ चरून श्रीहरीतें जिंकू इछिले परंतु आपणच निश्चेष्ट वर्तली तो अजिंक्य होय ३ श्लोक ॥ ॥ तस्याःपाटलपा णिजांकितमुरोनिद्राकषायेदृशौनिर्धूताधरशोणि माविलुलितस्रस्तस्रजोमूर्धजाः कांचीदामदरश्ल थांचलमितिप्रातर्निखातैर्दृशोरेभिःकामशरैस्तदद्भु तमहोपत्युर्मनःकीलितं ३ टी० याप्रकारें क्रीडत



असतां प्रातःकाळ जाला तेव्हां ( पाटलपाणिजांकितं तस्या उरः ( आरक्त नखें चिन्हित ऐसें तें राधेचें उरस्थळ आणखी ( अनिद्राकषायेदृशौ ) जागरणें आरक्त दृष्टी आणखी चुंबनें प्रक्षाळिला अधर रक्तिमा ( विलुलितस्रस्तस्रजोमूर्धजाः ) ढोळल्या आणखी स्खलित पुष्पमाला ज्याचे ठायीं ऐसे केश ( दरम्लथांचलकांचीदाम ) काहीसी ढिली आहे वस्त्रनिरीजीचे ठायीं ऐशी मेखलादाम ( इत्येभिः कामशरैस्त्रातः दृशोर्निखातैः ) ऐसे पांचही नखक्षतादि युक्त वक्षस्थळ अधर नेत्र केश मेखला लक्षण मदनाचे बाण प्रातःकाळीं पतीच्या नेत्रीं राधेनें आरोपिले त ह्मणजे या अवयवांतें याप्रकारें पतीनें पाहिले तेव्हां ( पत्युर्मनःकीलितं ) त्यांहीं पतिचें मन वेधिलें अहो अद्भुत ह्मणजे नेत्रीं आरोपिले बाण मनातें वेधिते जालेत हे आश्चर्य होय ४

श्लोक ॥ ॥ त्वामप्राप्यमयिस्वयंवरपरां क्षीरोदतीरोदरे शंके सुंदरिकालकूटमपिबन्मूढो मृडानीपतिः इत्थंपूर्वकथाभिरन्यमनसो विक्षिप्य वामांचलं राधायाः स्तनकोरकोपरिचलन्नेत्रो हरिः पातु वः ॥ ५ ॥

( हे सुंदरि क्षीरोदतीरोदरे मयि स्वयंवरपरां त्वां अप्राप्य मूढो मृडानीपतिः कालकूटं विषमपिबत् इत्यहं शंके

हेराधे क्षीरसमुद्राचे काठीं माझे ठाईं स्वयंवर परा ह्मणजे स्वयें मलाच वराया कारणें तत्पर ऐसी तूंजी तीलें नपावुन ह्मणजे तुझा लाभ नाहीं ह्मणून वैराग्यें मूढ महादेव काळकूटातें प्राशन करिताजाला ऐसें मी कल्पितों ॰ इत्थंपूर्वकथाभिरन्यमनसोराधायावामांचलंनिक्षिप्य ॰ याप्रकारें पूर्व कथाज्या तिहिं अन्यत्र आहे मनजीचें ह्मणजे कथेचे ठाईं एकाग्र चित्त ऐसी राधाजी तीच्या हृदय वामभागस्थ पदरातें वोढून ॰ स्तनकोरकोपरिचलन्नेत्रोहरिःवः पातु ॰ स्तनकुड्मलावर फिरतात दृष्टी ज्याच्या ऐसा तो हरी तुह्मातें रक्षो ५

श्लो॰ ॥ ॥ व्यालोलः केशपाशस्तरलितमलकैःस्वेदलोलौकपोलौस्पष्टादष्टाधरःश्रीःकुचकलशरुचाहारिताहारयष्टिः ॥ कांचीकांचिद्गताशांस्तनजघनपदंपाणिनाछाद्यसद्यःपश्यंतीत्यात्मरूपंनदतिविलुलितस्रग्धरेयंधुनोति ६ टी॰ ॰ केशपाशः व्यालोलः ॰ केशसमूह जोतो अस्तव्यस्त वर्ततो ॰ अलकैस्तरलितं चूर्णकुंतल जेते स्थानापासून चळलेत ॰ कपालौस्वेदलोलौ ॰ गाल घामानें व्यापिलेत ॰ दष्टाधरश्रीःस्पष्टा ॰ दंताही खंडिली अधरलक्ष्मी स्पष्ट भासते ॰ कुचकलशरुचाहारयष्टिःहारिता ॰ स्तनकलशाचीदीप्तीनें हारलतिका जिंकिली

कांचीकांचिदाशांगता ) मेखला कोणि एक दिशेप्रति
गेली ह्मणजे स्थानाहुनचळली ( इत्यात्मरूपंपश्यतीस्त
नजघनपदंपाणिना आछाद्यविलुलितस्त्रग्धरेयं
तदपिधुनोति ) याप्रकारें आपुल्या रूपातें पाहातहोत्सा
ती स्तनजघनस्थानातें करानें आछादून वर्तली घोळल्यापु
ष्प माळांनें वाहते ऐसी तथापि ती राधापतीतें ( धुनोति )
विव्हल करिते ( स्त्रग्धराशब्दें याछंदाचें नामहि सूचवि
लें ) ६ श्लोक ॥ ॥ ईषन्मीलितदृष्टिमुग्ध
हसितंसीत्कारधारावशादव्यक्ताकुलकेलिकाकुवि
कसद्दंतांशुधौताधरं ॥ श्वासोन्नद्धपयोधरोपरिप
रिष्वंगात्कुरंगीदृशोहर्षोत्कर्षविमुक्तनिःसहतनोर्ध
न्योधयत्याननं ७ श्वासोन्नद्धपयोधरोपरिपरिष्वं
गात् हर्षोत्कर्षविमुक्तनिःसहतनोः कुरंगीदृशः ) का
मजनितश्वासवशें कांहीसें चंचल स्तनजेत्यावर आलिंगनें क
रून हर्षाचा उत्कर्षजोतेणें मंद अशक्त तनुजीची ऐशी मृग
नयनाजी तीचे ईषन्मीलितदृष्टि कांहीसी संकुचित नयनें
ज्याचे ठाईं ऐसें सीत्कार परंपरावशें अस्पष्ट संभ्रमयुक्त की
डाजी तीचेठाईं शब्दविकारें प्रकट दंतकिरणजे तिहीं व्या
पिला अधरज्याचेठाईं ( आननंधन्योधयति ) याप्रका

रवें मुखजें त्यातें करिती पुरुषजोतोच चुंबितो ७

आर्या ॥ ॥ अथसहसासुप्रीतंसुरतस्यांतेनि तांतखिन्नांगी राधाजगादसादरमिदमानंदेनगो विंदं ८ टी० (अथ) यानंतर (सहसा) हास्ययु क्त ऐसी अत्यंत खिन्नांगी होत्साती राधा जीती सुरताचे अंतीं आनंदेंकरून गोविंदाप्रति आदरयुक्त हें बोलती जाली ८

श्रीहरीप्रति राधेचें भाषण

रामकरागेणगीयतेरूपक ताले अष्ट०

कुरुयदुनंदनचंदनशिशिरतरेणपयोधरे मृगमदपत्रकमत्रमनोभवमंगलकलशसहोदरे निजगादसायदुनंदने क्रीडतिहृदयानंदने धृ० १ अलिकुलगंजनसंजनकंरति नायकसायकमोचने त्वदधरचुंबनलंबित कज्जलमुज्वलयप्रियलोचने निज० २ नयनकुरंगतरंगविलासनिरोधकरेश्रुति मंडले मनसिजपाशविलासधरेशुभवेष निवेशयकुंडले निज० ३ भ्रमरचयंरुचि रंरचयंतमुपरिरुचिरंममसंमुखे जितकम



लेविमलेश्वरिकर्मयनर्मजनकमलकंसरवे नि

ज० ४ मृगमदरसवलितंललितंकुरु तिलक

मलिकर जनीकरे विहितकलंककलंकम

लाननविश्रमितश्रमसीकरे निज० ५ म

मरुचिरेचिकुरेकुरुमानदमानसजध्वजचा

मरे रतिगलितेललितेकुसुमानिशिखंडि-

शिखंडकडामरे निज० ६ सरसघनेजघने

ममशंबरदारणवारणकंदरे मणिरश

नावसनाभरणानिशुभाशयवासयसुंदरे

निज० ७ श्रीजयदेववचसिशुभदेहृदयं

सदयंकुरुमंडने हरिचरणस्मरणामृत

कृतकलिकलुषज्वरखंडने निज० ८

टी० - १ ( कुर्विति ) हृदयानंदनेयदुनंदने क्रीडति

साजगाद ) हृदयातें आनंदवितो ऐसा यदुनंदन क्रीडत अस

तां राधा बोलती जाली हे यदुनंदना चंदनवत् अत्यंत शीतल

ऐसा स्वहस्तें करून माझ्या या स्तनाचेठाईं कस्तूरीचें पत्रपंक्ती

वें रच हा स्तन कसा० मनोभवमंगलकलशसहोदरे )

मदन मंगलार्थ पूर्णकलशजो त्याचा बंधुह्मणजे तत्समान ऐसा

१ टी० ( अलिकुलेति ) हेप्रिये मदनबाणातें सोडणार

ऐसें माझें लोचन जें त्याचेठाईं भ्रमरसमूहातें तिरस्कारकारक ह्मणजे नेत्रामध्यें लाविता भ्रमराहून अधिक शोभतें ऐसें तुझा अधराचें चुंबन करून हरिलें ऐसें काजळ जें त्यातें पुनः लावावें २ टी० ( नयनेति ) हे शुभवेष ) हे सुंदरवेष धरश्रीहरे नयन मृगांचा तरंगवत् विलास ह्मणजे नयन लक्षण मृगाचा शीघ्रगतिरूप विलास जो त्याचा निरोध करिते ( मनसिजपाशविलासधरे ) मदनाचें आयुध पाश जो त्याचा विलासातें ह्मणजे सदृशलीलेनें धरितें ऐसे माझें कर्णद्वयजें त्याचे ठाईं कुंडलातें यथास्थानी स्थाप मृग गमनातें निरोधक पाशहोय कर्ण मदन पाशवत् सुंदरहोत कर्णपर्यंत नयन गतीत्या पुढें तें निरोधक ३ टी० ( भ्रमरेति ) हेसखे विमलेजितकमले ममसंसुखे उपरि सुचिरं रुचिरं भ्रमरचयं रचयंतं नर्मजनकमलकं परिकर्मय हे श्रीहरे निर्मलकमल त्याचेपरि माझें सुंदर मुखजें याचेठाईं उपरि बहुकाल भ्रमर समूहातें रचितो ह्मणजे कमलावर भ्रमरसमूहजसा तद्वत् मुखकमलावर शोभायमान ऐसा हर्षकारक केशसमूहजोत्यातें (परिकर्मय) विंचरून शोभिव ४ टी० (मृगमदेति) हे कमलाननविश्रमितश्रमसीकरे अलिकरजनीकरे मृगमदरसवलितंललितंविहितकलंककलंतिलकंकुरु



रे कमलवदना उपशांत आहेत श्रमकण ज्याचे ह्मणजे घामा
न प्रक्षाळून शुद्ध केला ऐसा ललाटरूप अर्धचंद्र जो त्यावर
कस्तूरीद्रव रचित सुंदर केली कलंकशोभा जेणें ऐसा तिल
क जो त्यातें रेख ५ टी० (ममरुचिरइति) हेमानदशि
खंडि शिखंडकडामरे मानसध्वजचामरे रतिगलि
तवलितेरुचिरेममचिकुरेकुसुमानिकुरु ) हेबहुमा
नदायका श्रीहरे मयूरपिछवत् आटोप ज्याचा अतएव मदना
चें चामर ह्मणजे मोरछलचकाय ऐशा रतिकाळीं गलित ह्म
णजे पुष्परहित जाला ऐसा रचिला सुंदर माझा केशपाश जो
त्याचे ठाईं पुष्पातें गुंफ ६ (सरसेति ) हे शुभा
शय शंबरदारणवारणकंदरे सरसघनेसुंदरेमम
जघनेमणिरशनावसनाभरणानिवासय ) हे महो
दारचित्त श्रीहरे कामकुंजराचें वासस्थान कामानुरागयुक्त
निबिड ऐसें सुंदर माझें जघनस्थळ जें त्यावर रत्नखचित कं
बरपट्टा आणि वस्त्र आणखी भूषणातें धारण करिव
७ टी० (श्रीजयदेवेति ) हरिचरणस्मरण अमृत
जें तेणेंकरून केलें आहे कलिकल्मषरूप ज्वराचें खंडन जेणें
ऐसें शुभप्रद आणखी मंडनें ह्मणजे हृदयाचे ठाईं अलंका
र रूप ऐसें हें श्रीजयदेवाचें वचन जें त्याचे ठाईं हे जना हृदयं

सदयंकुरु ) मदनातें दयायुक्तकर म्हणजे याजीलातें कृपेंकरून ऐक ८

श्लोक ॥ ॥ रचयकुचयोःपत्रंचित्रंकुरुष्वकपोलयोर्घटयजघनेकांचीमंचस्रजाकबरीभरं ॥ कलयवलयश्रेणींपाणोपदेकुरुनूपुरावितिनिगदितःप्रीतःपीतांबरोपितथाकरोत् ॥२॥ टी०

८ हेकृष्णाकुचयोःपत्रंरचय ) स्तनावर पत्रातें रच म्हणजे केशरादिकें चित्रविशेषातें कहाड ८ कपोलयोःचित्रंकुरुष्व गालावर पत्रपंक्तितें रेख ८ जघनेकांचींघटय ) कटिपुरोभागीं मेखलेतें अर्पणाकर पुष्पमालेनें केशातें ८ अंच ) शोभिव ८ पाणौवलयश्रेणींकलय ) करीं कंकण पंक्तीतें योज ८ पदेनूपुरौकुरु ) पायांत तोरड्या घाल हाअभिप्राय ८ इतिनिगदितःपीतांबरोपिप्रीतःसन्तथाकरोत् ) याप्रकारें राधेनें प्रेरिला पीतांबरश्रीहरीजोतोहि संतुष्ट होत्सा ता त्याप्रकारें करिताजाला म्हणजे तीच्यावचनातें आचरताजाला १

यानंतर ग्रंथांती मंगलाचरणातें आचरतो,

श्लोक ॥ पर्यंकीकृतनागनायकफणाश्रेणीमणीनांगणे संक्रांतप्रतिबिंबसंचलनयाबिभ्रद्वपुर्विक्रि

यां पादांभोरुहधारिवारिधिसुतामक्ष्णांदिदृक्षुः
शतैः कायव्यूहमिवाचरन्नुपचितलाकूतोहरिःपातु
वः॥२॥ टी० क्षीरसमुद्राचेठाईं शय्याकार वर्तला नाग
नायक ह्मणजे शेषजो त्याची फणा श्रेणी ह्मणजे सहस्त्र फ
णाची पंक्तीजी तीचेठायीं वर्तलेत सहस्त्र मणीजे त्याचेठा
ईं संचरलींत शेषशायि भगवंताची प्रतिबिंबेंजीं त्याचे रच
नेकरून ( वपुर्विक्रियांबिभ्रत् ) शरीर परंपरारूप वि
कारातें धरित होत्साता ( हरिःवः पातु ) श्रीहरी तुह्मातें र-
क्षो येथें उत्प्रेक्षाकरितो ( उपचिताकूतः पादांभोरुहधा
रिवारिधिसुतामक्ष्णांशतैर्दिदृक्षुः कायव्यूहंआ
चरन्निव ) अभिवृद्ध आहे लक्ष्मीप्रेमरूप अभिप्राय ऐसा
होत्साता पादकमळातें सेविते लक्ष्मीजी तीतें दोन सहस्त्र ने
त्रांहीं पाहावयाचे इच्छेनें सहस्त्र मूर्ती स्वीकारिता जालाच काय
ह्मणजे श्रीहरी प्रेमास्तव लक्ष्मीतें अधिक तर पाहावयाचे इच्छे
ने एकैकफणा मणीप्रति प्रतिबिंबमिषें सहस्त्र देहातें धरि
ता जालाच काय २ यानंतर कवि आपण केला प
रिश्रमजो त्यातें वर्णितो

श्लोक॥ ॥ यद्गांधर्वकलासुकौशलमनुध्यानंच
यद्वैष्णवंयच्छृंगारविवेकतत्त्वरचनाकाव्येषुलीला

यितं॥ तत्सर्वं जयदेवपंडितकवेः कृष्णैकतानात्मनः सानंदाः परिशोधयंतु सुधियः श्रीगीतगोविंदतः ३
श्रीजयदेव पंडित नामक कवि जो त्याचें गायन कलाचेठाई जे कौशल्य वर्ततें किंवा अनुक्षणी विष्णूचें चिंतन जें शृंगाररसाचा संयोग विप्रलंभादि विवेक जो त्याची तत्वस्वनाजीकाव्यामध्यें निर्दोष शब्दार्थ छंदोलंकारादिक विलसित जें त्या सर्वांत (सुधियः सानंदाः संतः श्रीगीतगोविंदतः परिशोधयंतु) पंडित आनंदयुक्त होत्साते श्रीगीतगोविंद हा ग्रंथ जो याचेठाई विवेकें शोध करोत श्रीजयदेव कवि कसंप्रकारचा (कृष्णैकतानात्मनः) कृष्णाचेठाई एकाग्र मन ज्याचें ऐसा १ श्लोक श्रीभोजदेवप्रभवस्य रामादेवीसुतश्रीजयदेवकस्य पराशरादिप्रियवर्गकंठे श्रीगीतगोविंदकवित्वमस्तु ॥ ४ ॥
टी० श्रीमंत भोज देव पिता जो त्यापासून जन्मला रामादेवी मातेचा पुत्र श्रीजयदेव कवि जो त्याचें श्रीगीतगोविंदरूप कवित्व पराशर नामक आदिकरून प्रियशिष्य समुदाय जो त्याचे कंठाचेठाई असो गीत ह्मणजे गायला गोविंद ज्याचेठाई तो गीतगोविंद जाणावा ४

इतिश्रीगीतगोविंदे महाकाव्ये जयदेवपंडितकृतौ प्रीतपीतां

वरोनामद्वादशः सर्गः १२ ७ ७

प्रीतः ह्मणजे राधेच्या संयोगें संतुष्ट आहे पीतांबर ह्मण जे श्रीकृष्णाजोतो ज्यासर्गाचेठाई तोहाद्वादशःसर्ग इति

श्लो० ॥ टीकेंत हेंनायकनायिकाचें अलंकृतिछंदरसादिकाचे त्यात्यास्थळींदाखविन प्रभेदबोलूनियांलक्षणहीसभेद ॥ १ ॥ परंतुवाटेलमहान्प्रबंध घडेलहीबालमतीसबंध ॥ ह्मणूनितोत्याज्यप्रसंगकेला शास्त्रांलपाहाजरितूं भुकेला ॥ २ ॥ श्रीकुंभककर्णीलहिलांविशेषआहेंनरागादिकही अशेष भावार्थही विस्तृततेथकेलापाहावरेंतेथजरीफकेला ॥ ३ ॥ टीकेंतहेंप्राकृतशब्दहीकीपरंतुअर्थेदुरितासिहाकी ॥ पाहूंचयेयेथहितांविलास विश्वासअर्थीजरिठेविलास ॥ ४ ॥ टीकाहेंप्रायशःकेली संस्कृतान्वयपूर्वक ॥ यथाधिक्यपायेंकाठेत्यागिलासंस्कृतान्वय ॥ ५ ॥ श्रीगीतगोविंदमिमंविचार्यमहेश्वरः कोंकणभाषयेत्थं ॥ टीकांव्यधान्मंगलदीपिकाख्यां देवोनयातुष्यतुवासुदेवः ॥ ६ ॥ आर्या ॥ कोंकणभाषेमध्यें स्फुटबोधजेअसामान्य ॥ तेकाढिलेयथामतिलेखकराहोबुधाअसामान्य ॥ ॥ ॥

प्राज्ञसरवारामतनुजविठ्ठलनामाग्निहोत्रिसाधुकृती
स्वीयशिलायंत्रावरिछापविती ग्रंथजाणुनी सुकृ
ती ॥ २ ॥ श्रीमान् गरुडध्वजतो श्रोत्याला आणि
वाचकाला ही ॥ संपत्तीलें देवो दुरकरो तो दरिद्रा धिका
लाहीं ॥ ३ ॥ ॥ ॐ ॥

समाप्तं